# वेरूळचीं लेणीं.



त्रिंबक गंगाधर धनेश्वर.

# वेरूळचीं लेणीं.



हें पुस्तक

**त्रिंबक गंगाधर धनेश्वर,**

सेकंड क्लार्क, डिस्ट्रिक्ट कोर्ट, अहमदनगर,

यांनीं लिहिलें,

तें,

मुंबईंत,

तुकाराम जावजी,

यांनीं आपल्या निर्णयसागर छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

१९०९.

---

किंमत दहा आणे.

---

हिज हायनेस आसफ जाह

मुझाफर-अल्-मुल्क निझाम-उल्-मुल्क

निझाम-उद्-दौला

नबाब मीर सर महबूब अलिखान

बहादुर फत्तेजंग,

जी. सी. बी., जी. सी. एस्. आय्.

हैदराबाद संस्थान

यांचे सेवेसीं

हें पुस्तक

ग्रंथकर्त्यानें अतिनम्रतेनें, आदरपूर्वक

आज्ञा घेऊन अर्पण केलें

आहे.

# प्रस्तावना.

वेरूळचीं लेणीं पाहून आलेल्या गृहस्थांच्या तोंडून त्यांजविषयीं प्रशंसापर उद्गार वारंवार कानीं पडल्यामुळें तीं लेणीं प्रत्यक्ष पाहण्याची मनीषा उत्पन्न होणें साहजिक आहे. ती तृप्त करण्याचे आमचे बेत दोन तीन वर्षें एकसारखे चालू होते. परंतु दरसाल कांहीं तरी विघ्न येत गेलें, अखेरीस १९०१ च्या दिसेंबरच्या नाताळांत तो योग जुळून आला. प्रवासांत एकट्यापेक्षां मित्रमंडळीचा सहवास असला आणि जमावानें लांबचा प्रवास केला—मग तो पायवाटेनें असो किंवा रेलवेनें असो—ह्मणजे तो कंटाळवाणा व त्रासदायक होत नाहीं. नाताळापूर्वीं सरासरी पंधरा दिवस लिबरल क्लबांतील सात आठ मंडळीचा वेरूळचीं लेणीं पाहण्यास जाण्याचा निश्चय ठरला; आणि त्याप्रमाणें मंडळी प्रवासाच्या तयारीस लागली. ज्या ठिकाणीं जावयाचें असेल त्या ठिकाणची व त्याच्या आसपासच्या स्थळांची चौकशी प्रवाशी अगोदर करितात. इंग्रजी विद्येच्या सहवासानें ह्या प्रवृत्तीस चांगलेंच पुष्टीकरण मिळालें आहे व ग्याझिटियर्समध्यें माहिती पाहण्याची पुष्कळांस संवय झाली आहे. त्या दृष्टीनें साहजीकपणें औरंगाबाद ग्याझिटीअरमध्यें प्रथमतः लेण्याची माहिती सांपडेल असें वाटून त्या पुस्तकाचा शोध केला, परंतु तें येथें कोणापाशीं किंवा लायब्ररींतही मिळालें नाहीं. मराठींत एखादें पुस्तक असल्यास पहावें ह्मणून पुस्तकांच्या यादी धुंडाळल्या परंतु अगदीं निराशा झाली. अखेर १८२९ सालीं एका युरोपियन प्रवाशानें रायल सोसायटीपुढें वाचलेल्या एका इंग्रजी निबंधाची प्रत आमच्या दृष्टीस पडली. तेव्हां आनंद वाटून त्या निबंधाच्या साह्यानें लेणीं पाहण्याचें आम्हीं ठरविलें.

खुद्द वेरूळ येथें गेल्यावरही लेण्यांच्या माहितीचें एखादें पुस्तक छापून प्रसिद्ध झालें आहे काय याबद्दल चौकशी केली, परंतु नकारार्थी उत्तरें मिळाल्यामुळें व लेणीं पहात असतां तेथील माणसांकडून असंबद्ध व भाकड कथांनीं भरलेली व वाटेल त्या पौराणिक गोष्टींचा बादरायण संबंध जोडून देणारी हास्यास्पद माहिती आमच्या कानीं पडल्यामुळें वेरूळच्या लेण्यांसारख्या प्रेक्षणीय स्थळाचें वर्णन मराठी भाषेंत नसावें ह्या शोचनीय स्थितीबद्दल आह्मां सर्वांस फार खेद वाटला, आणि ही उणीव भरून काढण्याचा झाल्यास अल्प प्रयत्न करावा ह्मणून मनांत विचार उद्भवला. त्याचेंच दृश्यस्वरूप हें पुस्तक होय.

लेण्यांसंबंधानें अनेकांच्या अनेक कल्पना आहेत. कोणी ह्मणतात हीं लेणीं परमेश्वरानें अचानक वरून खालीं सोडून दिलीं असलीं पाहिजेत; हिंदु लोकांसारख्या रानटी लोकांच्या हातून इतकें अचाट कौशल्याचें काम होणें दुर्घट आहे, असेही कित्येकांनीं तारे तोडिले आहेत! आपल्या लोकांचा त्यांजविषयीं ग्रह पाहिला, तर ज्या महान् पराक्रमी पूर्वजांनीं हीं लेणीं खोदिलीं त्यांचे अजागळ वंशजांनीं तीं पांडवकृत्यें ह्मणून दैविक कृती मानिलेली आहे! अशा स्थितींत सर्वांस आश्चर्यचकित करणाऱ्या ह्या मानवी कृतीचें अल्प प्रमाणानें कां होईना पण यथार्थ ज्ञान व्हावें ह्मणून हा अल्प प्रयत्न केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे हें ठरविण्याचें काम विद्वान् देशबांधवांकडे आहे.

लेणीं पाहतांना केलेल्या टिपणांशिवाय हें लहानसें वर्णनात्मक पुस्तक तयार करण्याचे कामीं ज्या इंग्रजी पुस्तकांचा मला विशेष उपयोग झाला आहे त्यांचा नामनिर्देश पुस्तकांत योग्य ठिकाणीं करण्यांत आला आहे. युरोपियन विद्वान् शोधकांनीं आपणांवर फार उपकार करून ठेविले आहेत. त्यांचे उतराई होण्याचा फक्त एक मार्ग आहे. तो त्यांनीं ग्रथित करून ठेविलेली उपयुक्त आणि बहुमोल माहिती सर्वांस उपलब्ध करून देणें हा होय.

या माझ्या अल्प प्रयत्नांत बऱ्याच विद्वान् मित्रांचें मला साह्य मिळालें आहे त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें. त्यांजमध्यें माझे सन्मान्य, विद्वान् आणि शोधक मित्र रा. रा. शिवराम एकनाथ भारदे यांच्या मदतीचा मला विशेष लाभ झाला या गोष्टीचा येथें उल्लेख करणें अवश्य आहे.

मराठी भाषेंतील प्रसिद्ध ग्रंथकार रावसाहेब विनायक कोंडदेव ओक यांनीं प्रोत्साहन देऊन हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचे कामीं मला सर्वतोपरी साह्य केलें, याबद्दल मी त्यांचा फार फार ऋणी आहें. नगर येथील नांदे आणि कंपनीनें या पुस्तकांत घालण्यासाठीं त्यांनीं मुद्दाम घेतलेल्या लेण्यांच्या फोटोंचा उपयोग करण्याची आनंदानें परवानगी दिली, व शेवटीं निर्णयसागर छापखान्याचे मालक रा. रा. तुकाराम जावजी शेट, जे. पी., यांनीं मोठ्या उदार बुद्धीनें हें पुस्तक सर्व हक्कासह घेऊन छापण्याचें पत्करिलें याबद्दल सर्वांचे मी मनःपूर्वक फार फार आभार मानितों व हा लेख पुरा करितों.

अहमदनगर
ता. १ नोव्हेंबर १९०९.

पुस्तककर्ता.



# प्रकाशकांची सूचना.

हें पुस्तक रा. रा. त्रिंबक गंगाधर धनेश्वर ह्यांपासून सगळ्या हक्कांसह विकत घेऊन आह्मीं छापिलें आहे. ह्यांतल्या विषयाचा बोध ह्याच्या नांवावरून सहज होण्यासारखा आहे, ह्मणून त्याविषयीं येथें कांहीं लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. हे ग्रंथकार स्वतः तीं लेणीं पाहून आले आहेत, त्यांच्या हातचें हें वर्णन आणि नुसत्या पुस्तकांवरून लिहिलेलें वर्णन, ह्यांतलें अंतर रसिक वाचकांच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे. पुस्तक छापतांना थोडें कोठें आवश्यक वाटलें तेवढें कमजास्त करण्याची मोकळीक आह्मांस ग्रंथकारांनीं दिली होती, ह्यावरून त्यांच्या मनाची सरळता दिसून आली आहे. हें पुस्तक लोकादरास पात्र होवो.

**तुकाराम जावजी,**

प्रकाशक.



# अनुक्रमणिका.



## चित्रानुक्रमणिका.







# वेरूळचीं लेणीं.



## उपोद्घात.



जग ह्मणजे काय या प्रश्नास जो तो आपापल्या समजुतीप्रमाणें उत्तर देईल. वरवर दृष्टीनें पाहाणाऱ्यास त्यांतील रहस्य कळत नाहीं. परंतु सूक्ष्मदृष्टीनें पाहणारे जे जिज्ञासु असतात त्यांना, जग हें क्षणोक्षणीं ज्ञान प्राप्त करून घेण्याचें साधन वाटतें. मानवी दृष्टीस गोचर असणारें संपूर्ण विश्व हें असंख्यात चमत्कारांचें भांडार आहे. ह्या चमत्कारांचें अवलोकन करून कवींना काव्याची स्फूर्ति झाली आहे, ज्योतिष्यांना ग्रहांच्या गतींचें ज्ञान झालें आहे, रसायनशास्त्रवेत्त्यांना रसायनक्रिया उपलब्ध झाली आहे, धन्वंतऱ्यांना वनस्पतींचे व इतर पदार्थांचे गुणावगुण ज्ञात झाले आहेत, व तत्ववेत्त्यांना तत्वज्ञान प्राप्त झालें आहे. एकंदरींत या जगांत ज्ञानभांडार ह्मणून जें मानिलें जातें तें सर्व चमत्कारांनीं भरलेलें आहे. हे चमत्कार दोन प्रकारचे आहेत. नैसर्गिक आणि कृत्रिम. हिमालयासारखे नगाधिराज, गंगायमुनांसारख्या नद्या, मोठमोठ्या निबिड अरण्यांतील व वनांतील सृष्टिसौंदर्य, हिंस्र वनचर पशु, वायुगतीनें पळणारे मृगासारखे निरुपद्रवी पशु, यांशिवाय प्राणिकोटींतील अगणित जीवजंतु, गगनासारखी अफाट पोकळी, समुद्रासारखा अपार जलसमूह, इत्यादि चमत्कार नैसर्गिक होत. ह्या सर्व नैसर्गिक

चमत्कारांमध्यें मनुष्यप्राणि हा सर्वांत मोठा चमत्कार आहे. कारण, हल्लीं सृष्टीचें जें स्वरूप आहे, व तिच्या नैसर्गिक लावण्यांत ठिकठिकाणीं जी भर पडली आहे, ती मनुष्यकृतीचें फळ आहे. विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली असें आपण पुराणांत वाचितों, पण वास्तविकपणें ईश्वरनिर्मित सृष्टीवर पेहराव चढविण्याचें अथवा तिला नाना अलंकारांनीं विभूषित करण्याचें काम जगाच्या उत्पत्तीपासून प्रत्येक राष्ट्रांत कमीअधिक मानानें होत आलें आहे. ज्यांच्या अवलोकनानें आनंद व आश्चर्य इत्यादि भावना मनामध्यें उत्पन्न होतात, असे मानवी चमत्कार पृथ्वीवरील निरनिराळ्या देशांत दृग्गोचर होतात.

हा आपला हिंदुस्थान देश पृथ्वीच्या पाठीवर जितके देश आहेत त्या सर्वांत फार प्राचीन काळापासून प्रख्यातीस आलेला आहे. त्याची ख्याति अनेक कारणांवरून झालेली आहे. तीं कारणें सविस्तर सांगूं म्हटलें तर निराळा ग्रंथच होईल. मुख्यतः सृष्टिसौंदर्याच्या कामीं हा देश कोणत्याही दुसऱ्या देशास हार जाणार नाहीं. त्याप्रमाणेंच जगांतील नामांकित चमत्कारांमध्यें गणण्यास योग्य असे मानवी चमत्कारही या देशांत आहेत. त्यांमध्यें, अनेक शतकांपूर्वीं, ज्या वेळीं, पृथ्वीवरील हल्लींचीं सुधारलेलीं व संपत्तिवैभवाच्या शिखरास जाऊन पोंचलेलीं राष्ट्रें रानटी स्थितींत होतीं, तेव्हां या देशांतील हुशार कारागिरांनीं आपल्या कौशल्याचे जे नमुने निर्माण करून ठेविले आहेत, त्यांची गणना होते. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत असलेलीं कोरींव लेणीं त्यांत प्रमुख होत. या लेण्यांत दिसून येणारी कारागिरी, त्यांचें वैभव व अनुपम सौंदर्य पाहून कोणीही चकित झाल्याशिवाय राहत नाहीं. हीं लेणीं फार प्राचीन काळीं अस्तित्वांत आलीं असल्यामुळें इतिहासदृष्ट्याही त्यांचें फार महत्व आहे. हीं लेणीं पाहून या देशांतील लोक केवळ अडाणी आणि रानटी आहेत असें समजणाऱ्या सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकांचे, या देशांतील लोकांविषयींचे ग्रह बदलले आहेत. माणसांनीं हीं लेणीं कोरिलीं असतील हें संभवनीय नाहीं, तीं ईश्वरानें स्वर्गातून ठिकठिकाणीं अचानक खालीं सोडून दिलीं असलीं पाहिजेत, असेंही कित्येकांचें मत आहे. तीं पांडवकृत्यें आहेत असेंही

कित्येक मानतात. परंतु हे ग्रह हल्लीं पालटत चालले आहेत. शेंकडों युरोपियन दरसाल हिंदुस्थानांत प्रवासास येतात व हीं लेणीं पाहून आश्चर्यचकित होतात. हिंदुस्थानच्या प्राचीन वैभवाविषयीं त्यांच्या मनावर उत्तम ग्रह झाल्याशिवाय राहत नाहीं. उघड्या हवेंत बांधलेले उत्तम आणि मनोरम व दृष्टीस आल्हाद्कारक असे राजवाडे, सुंदर मंदिरें अथवा भव्य मनोरे कालेंकरून नष्ट होतात. भारतांत वर्णन केलेल्या सभांचा व मंदिरांचा आज पत्ता नाहीं. रामायणांत वर्णन केलेल्या अयोध्यापुरीचें वैभव पूर्णपणें लयास गेलें आहे; परंतु हीं लेणीं खडकांच्या आणि डोंगरांच्या पोटांत कोरलेलीं असल्यामुळें त्यांनीं ऊन, वारा आणि पाऊस इत्यादि काळाच्या विध्वंसक दूतांस आजपर्यंत फारसें जुमानिलें नाहीं. तीं अगदीं नुकतींच कोरिलीं आहेत असें दिसतें. हीं लेणीं केव्हां कोरिलीं असावीं याचा कालनिर्णय निश्चितपणें झालेला नाहीं. अलीकडे कांहीं शोधकांनीं या कामीं प्रयत्न केला आहे. गौतम बुद्धानंतर हीं लेणीं अस्तित्वांत आलीं असें त्यांचें मत आहे. या मुद्याचें विवेचन पुढें एका भागांत केलें आहे. साधारणपणें लोकांची अशी समजूत आहे कीं, पांडव वनवासांत असतां त्यांचें राहणें जेथें जेथें झालें तेथें तेथें त्यांनीं लेणीं कोरून ठेविलीं ! या समजुतीस दंतकथेशिवाय दुसरा आधार नाहीं. तेव्हां ती कितपत विश्वसनीय मानावी हा प्रश्न आहे. बौद्ध धर्माचा विशेष उत्कर्ष अशोकाच्या वेळीं झाला हें इतिहासांत प्रसिद्ध आहे. हा राजा होऊन गेल्यास दोन हजारांवर वर्षें होऊन गेलीं. त्याच्यापूर्वीं हीं लेणीं अस्तित्वांत नव्हतीं हें युरोपियन शोधकांचें ह्मणणें मान्य केलें, तरी त्यांच्या प्राचीनत्वास बाध येत नाहीं. इतक्या प्राचीन इमारती इजिप्त देशांतील मनोऱ्यांशिवाय पृथ्वीवर दुसऱ्या कोठेंही नाहींत.

हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत जीं लेणीं आहेत तीं एकाच काळीं अस्तित्वांत आलीं असें ह्मणतां येत नाहीं, किंवा एकाच पंथाच्या लोकांचें तें काम आहे असेंही नाहीं. एकंदर सर्वांच्या रचनेवरून पाहिलें असतां कांहीं बौद्धधर्माच्या अनुयायांनीं, कांहीं हिंदूंनीं व बाकींचीं जैनांनीं कोरिलीं

असावीं, याची साक्ष थोड्या सूक्ष्मदृष्टीच्या माणसास तेव्हांच पटते. कांहीं लेणीं अगदीं नवीन कोरिलीं आहेत असें कित्येकांचें ह्मणणें आहे. वेरूळ येथील इंद्रसभा हें अगदीं अलीकडील लेणें आहे असें शोधकांचें मत आहे. तथापि तें सुद्धां नऊशें वर्षांचें आहे असा त्यांनीं शेरा मारिलेला आहे.

हिंदुस्थान देशांत फार प्राचीन काळापासून अनेक राजकीय, धार्मिक आणि सामाजिक उलाढाली होत आल्या आहेत. हिंदुधर्मापासून, अगर शास्त्रोक्त भाषेंत बोलावयाचें असल्यास, वैदिक धर्मापासून बौद्धधर्माची उत्पत्ति ही त्यांजमध्यें अत्यंत महत्वाची गोष्ट आहे. तिचा बोधप्रद आणि मनोरंजक इतिहास जितका उपलब्ध असावा तितका नाहीं. अर्वाचीन पद्धतीप्रमाणें ऐतिहासिक माहिती नमूद करून ठेवण्याची आवश्यकता आमच्या पूर्वजांस न वाटल्यामुळें तत्कालीन स्थितीचा अंदाज इतर गोष्टींवरून करणें भाग पडतें.

बौद्धधर्म कसा उत्पन्न झाला, त्याची वाढ कोणत्या प्रमाणानें झाली, ती होण्यास त्या धर्माचा प्रसार करणाऱ्यांनीं कोणत्या साधनांचा उपयोग केला असावा, याचा इत्थंभूत इतिहास जरी उपलब्ध नाहीं, तरी हीं कोरींव लेणीं ह्या सर्व प्रश्नांचा उलगडा होण्यास चांगलें साधन आहे. ब्राह्मणधर्म बहुतेक लोपून जाण्याइतका बौद्ध धर्माचा प्रसार झाला होता, ह्मणून इतिहासदृष्टयाही ह्या लेण्यांचें फार महत्व आहे हें उघड आहे. त्यांपैकीं बरींचशीं लेणीं जरी बौद्धधर्माचीं आहेत तरी कांहीं हिंदूंचीं व जैनांचींही आहेत, असें पाहणारांस सहज दिसून येतें. बौद्धधर्माचा ऱ्हास व्हावयास लागल्यानंतर तीं कोरिलीं असावीं. बौद्धांच्या लेण्यांपेक्षां तीं जास्त मनोवेधक व सुंदर आहेत. कांहींचें वैभव इतकें मोठें आहे कीं, तें अवलोकन करून पाहणारा क्षणभर भांबावल्यासारखा होतो!

अत्यंत प्राचीन अशीं लेणीं बहार प्रांतांत आहेत. बौद्धांनीं आपल्या लेण्यांस चैत्य, विहारशाळा व गृह अशीं निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. चैत्य ह्मणजे देऊळ, विहार अथवा मठ, शाळा आणि गृहें असे त्यांच्या उपयोगानुरूप लेण्यांचे भेद केलेले आहेत. हिंदुस्थानच्या एका विवक्षित भागांतच लेणीं कोरलेलीं आहेत असें नसून तीं ठिकठिकाणीं निरनिराळ्या प्रांतांत

आहेत. आजपर्यंत शोध लागलेल्या लहानमोठ्या लेण्यांची संख्या हजाराहून जास्त आहे. *कोंकणांत महाडाजवळ, मुंबईपासून बेचाळीस मैलांवर कुड्यांचीं लेणीं, ठाण्याचे पूर्वेस जम्बुर्गचीं लेणीं, मुंबईनजीक एलिफंटा अथवा घारापुरीचीं लेणीं आहेत. या सर्वांत घारापुरीचीं लेणीं जास्त प्रख्यात आहेत. ठाण्याजवळच्या लेण्यांत भैरवनाथाचें लेणें प्रसिद्ध आहे. राजमाची टेंकडीजवळ कोंडाणें गांवानजीक एक लेणें चांगलें आहे. याशिवाय चिपळोण, दाभोळ, संगमेश्वर वगैरे ठिकाणींही लहान लहान लेणीं आहेत. पुणें जिल्ह्यांत शेलारवाडीचीं, इंद्रायणीचीं, भांबुर्ड्याचीं, जुन्नरचीं आणि कार्लींचीं लेणीं आहेत. जुन्नरच्या लेण्यांस लेण्याद्री ह्मणण्याचा प्रघात पडला आहे. जुन्नर हा गांव रेलवेपासून अंतरावर असल्यामुळें तेथील लेणीं लोकांस फारशीं माहीत नाहींत. या लेण्यांत एक गणपतीचें स्थान प्रेक्षणीय आहे. कार्लींचीं लेणीं पहावयास बरेच लोक जातात. कारण तीं स्टेशनापासून जवळ आहेत. सातारा जिल्ह्यांत वाईचीं लेणीं व कऱ्हाडचीं लेणीं, कोल्हापुराजवळ पन्हाळ्याचें व गोकाकच्या धबधब्याजवळही कांहीं आहेत. नगर जिल्ह्यांत हरिश्चंद्राच्या डोंगरावर कांहीं आहेत, व नाशीकपासून पांच मैलांवरही कांहीं आहेत. मोंगलाईंत लेण्यांचा सर्वांत जास्त भरणा आहे. पैठण, अंकाई टंकाई, औरंगाबाद, वेरूळ आणि फरदापूर अथवा अजिंठा येथील लेणीं त्यांत नामांकित आहेत. औरंगाबाद शहराच्या आसपासचा डोंगर बहुतेक कोरलेला आहे. पण वेरूळ आणि अजिंठा येथील लेणीं मोठीं, विस्तृत आणि विशेष प्रेक्षणीय आहेत. यांशिवाय बदामीचीं लेणीं, एवाली लेणीं, भाजालेणीं, पितळ खोरा लेणीं, तुळजा लेणीं, व बडसा लेणीं हीं प्रसिद्ध आहेत. अलीकडे दोनचार वर्षांत इंदूर प्रांतांत व बंगाल्यांतही कांहीं महत्वाच्या लेण्यांचा शोध लागला आहे. बौद्ध धर्मानुयायांचीं जीं लेणीं आहेत, त्या सर्वांमध्यें अजिंठ्याचीं लेणीं फार सुंदर आहेत. हिंदुकुश पर्वतांत आणि अफगाणिस्थानांत जलालाबादच्या खोऱ्यांत काबूल नदीच्या कांठींही कांहीं लेणीं आहेत. वर नमूद केलेल्या लेण्यांशिवाय कांहीं ओरिसा

---

* रायल एशियाटिक सोसायटीचें जर्नल सन १८५०.

प्रांतांत कटकशहराजवळ आहेत. मद्रास इलाख्यांत फक्त एक असून तें मद्रासच्या दक्षिणेस कांहीं अंतरावर आहे. लेण्यांचा बहुतेक भरणा मुंबई इलाख्यांत व दक्षिण हैदराबाद प्रांतांत आहे. यांशिवाय डोंगरांतून लहान प्रमाणावर कोरलेल्या अशा पुष्कळ गुहा ठिकठिकाणीं आहेत पण त्यांस लेणीं ही संज्ञा शोभत नाहीं.

वेरूळचीं लेणीं पाहण्यास शेंकडों लोक जातात. त्यांना तेथील लोक सांगतात त्या हकीकतीवर संतुष्ट राहावें लागतें. विशेष माहिती मिळत नाहीं. ही उणीव भरून काढण्याच्या उद्देशानें वेरूळचीं लेणीं प्रत्यक्ष पाहून, त्यांचें हें वर्णन यथामति वाचकांस सादर करण्याचा हा प्रयत्न केला आहे.





घृष्णेश्वराचे देऊळ.

## वेरूळ.

निजाम सरकारच्या राज्यामध्यें औरंगाबाद जिल्ह्यांत, पूर्वीं देवगिरी अथवा देवगड ह्मणत आणि हल्लीं दौलताबाद म्हणतात, त्या इतिहासप्रसिद्ध गांवापासून सुमारें पांच कोसांवर वेरूळ नांवाचें एक लहानसें खेडें आहे. या खेड्याचा संबंध मराठ्यांच्या इतिहासाशीं आहे. मराठी राज्याची स्थापना करून ज्यानें आपलें नांव इतिहासांत अजरामर करून ठेविलें आहे त्या शिवाजी महाराजांचे पूर्वज या गांवीं राहत असत. हा गांव एका लहानशा नदीच्या कांठीं आहे. गांव सुपीक असून भोंवतीं झाडांची गर्दी असल्यामुळें एकंदरींत देखावा मनास हुरूप आणणारा व नेत्रांस आल्हाद देणारा आहे. गांवांत बरीच वस्ती भिक्षुकांची आहे. वेरूळ हें क्षेत्राचें ठिकाण असल्यामुळें या भिक्षुकांना यात्रेकरूंपासून प्राप्ति होते. गांवाबाहेर लेण्यांकडे जावयाचे वाटेवर सुप्रसिद्ध दानशूर अहिल्याबाई होळकरणीनें बांधलेलें एक शिवालय आहे. तें मजबूत बांधलेलें असून सुस्थितींत आहे. देवालयांतील शिवलिंगाचें नांव घृष्णेश्वर आहे. त्याची गणना बारा ज्योतिर्लिंगांमध्यें आहे.

देवालयाबाहेर कुंडाकृति एक तीर्थ आहे. तेथें भाविक लोक स्नान करून स्वतःस पुनीत करून घेतात. या तीर्थासंबंधानें अशी हकीकत सांगतात कीं, इलिचपुर हें एका कालीं जेव्हां राजधानीचें शहर होतें तेव्हां तेथें येलु नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला कांहीं रोग होऊन त्याच्या शरीरांत किडे पडले होते. त्यानें आपला दुर्धर रोग बरा व्हावा ह्मणून शेंकडों वैद्यांचे उपचार केले व नाना उपाय योजिले आणि हरप्रयत्न केले, पण गुण काडीमात्र आला नाहीं. शेवटीं त्यास साक्षात्कार झाला कीं, तूं या तीर्थांत स्नान केल्यानें व्याधिमुक्त होशील. त्याप्रमाणें त्यानें स्नान केल्यावर त्याचें शरीर निकोप झालें. ही गोष्ट घडल्यास आठ हजार वर्षें होऊन गेलीं आहेत. आणखी अशीही दंतकथा आहे कीं, याच येलु राजानें लेणीं कोरण्यास प्रारंभ केला. परंतु इतिहासांत तगर वंशांतील ज्या येलु राजाचा उल्लेख सांपडतो त्याला फक्त एक हजार वर्षें होऊन गेलीं आहेत. तीर्थाविषयीं दिलेली ही हकीकत खरी असो वा नसो. एवढी गोष्ट खरी आहे कीं, तिजमुळें या

तीर्थास भाविक लोकांच्या दृष्टीनें महत्व आलें आहे. आणि वेरूळच्या ग्रामस्थ भिक्षुकवर्गाच्या चरितार्थाचें तें एक मुख्य साधन बनलें आहे. हें तीर्थ हिंवाळ्यांत हिरव्यागार शेवाळानें पूर्णपणें आच्छादिलेलें असतें. तीर्थास चोहोंकडून पायऱ्या असून तें सुरेख मजबूत बांधलें आहे. तीर्थांतील पाण्याचें आच्छादिलेलें रूप व त्याचा रंग पाहिल्याबरोबर स्नान करण्याची इच्छा कोणासही होत नसेल. परंतु शेंकडों श्रद्धाळु लोक नाकतोंड घट्ट दाबून धरून एकदां बुडी मारून बाहेर निघतात! घृष्णेश्वर हें ज्योतिर्लिंग असल्यामुळें पुष्कळ शिवभक्त येथें दर्शनास येतात. देवळाच्या पटांगणांत जाण्याचीं द्वारें लहान आहेत, पण आंत देवळाभोंवतीं जागा प्रशस्त असून स्वच्छ ठेविलेली असते. देवळाची बांधणी तंजावरकडील देवळांप्रमाणें आहे. देवळाचा सभामंडप सभोंवार उघडा असून हवाशीर आहे. एकंदरींत देऊळ सुंदर आहे.

क्षेत्राचीं जितकीं ठिकाणें आहेत, तेथील भिक्षुक ब्राह्मणांची अशी वहिवाट आहे कीं, जी मंडळी यात्रेला येते त्यांची नांवनिशी ठेवावयाची व बाहेरगांवचा कोणीही माणूस आला ह्मणजे आपल्या चोपड्या घेऊन त्याच्या बिऱ्हाडीं जमावयाचें. वाटेंतच जर कोणी भेटला तर तो तेथूनच त्याचा पाठलाग करितो. आपल्या चोपडींत त्याच्या पूर्वजांपैकीं कोणाचें तरी नांव निघेल या उत्कंठेनें प्रत्येक ब्राह्मण आपली चोपडी चाळण्याची चपळाई करितो. परंतु अलीकडील इंग्रजी शिकलेल्या कांहीं खमंग मंडळीपुढें त्यांची डाळ शिजत नाहीं! या लोकांस कांहीं प्राप्ति झाली नाहीं ह्मणजे त्यांच्या हातून जें वर्तन होतें तें पाहून त्यांच्या हीन स्थितीबद्दल खेद वाटल्याशिवाय राहत नाहीं. स्वधर्म व स्वकर्तव्य विसरून केवळ परावलंबी बनल्यानें ब्राह्मण भिक्षुकांची स्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक शोचनीय होत चालली आहे. ब्राह्मणांस त्यांच्या ज्ञानसंपन्नतेनें जें श्रेष्ठत्व प्राप्त झालें होतें तें त्यांनीं कायम ठेविलें नाहीं. हल्लीं ज्ञानाचा सर्वत्र प्रसार होत असल्यामुळें भिक्षुकवर्गाचें वजन दिवसानुदिवस कमी कमी होत चाललें आहे. एकनाथांनीं या भिक्षुकवर्गास उद्देशून एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, 'यापरी स्वधर्म जाण। उपेक्षिति गा ब्राह्मण। मग लोकांतरीं कोरान्न। मागावया

कण धावती ॥' ज्या ब्राह्मणांनीं फार प्राचीन काळीं वैदिक ग्रंथ कायम ठेवण्याची अमोल कामगिरी बजावली, त्यांच्याच वंशजांनीं ज्ञानार्जनाचा मार्ग सोडून देऊन केवळ भिक्षेवर अवलंबून रहावें हें गर्हणीय आहे. आपलें श्रेष्ठत्व कायम रहावें, अशी जर त्यांची इच्छा असेल, तर केवळ पढिक अर्थज्ञानशून्य शास्त्री न बनतां विद्यादेवीचे भक्त बनावें, ह्मणजे ती आपल्या भक्तांचा अनादर न करितां त्यांची मानमान्यता लोकांमध्यें खात्रीनें जास्त वाढवील.



## लेणीं.

अलीकडे मनमाडपासून निजाम सरकारच्या राज्याच्या हद्दींत आगगाडी झाल्यामुळें वेरूळला जाणें फार सोईचें व सुखकर झालें आहे. दौलताबाद अगर त्याच्या अलीकडील स्टेशनावर उतरलें असतां तेथें बैलगाड्या मिळण्याची पंचाईत पडत नाहीं. एखादे वेळीं मोठ्या अमलदाराची स्वारी तेथें दौऱ्यावर आली असली तर मात्र गाड्या मिळणें कठीण जातें. अशा वेळीं कोणाची धांव पडते, कोणाचा आंख मोडतो, कोणाची साटी खिळखिळी होते, तर कोणाचा बैल लंगडतो, अथवा चुकारीस जातो. सारांश ज्या गाड्यांच्या मालकांस दौऱ्याची खबर लागली असते त्यांच्या गाड्या मोडतात व बैल चालेनातसे होतात! अशा वेळीं मात्र प्रवाशी लोकांस त्रास पडण्याचा संभव असतो. वेरुळला रस्ता देवगडच्या किल्ल्याच्या दरवाजासमोरून जातो. वाटेंत मशिदीविषयीं प्रसिद्ध असलेलें रोझें लागतें. तेथून थोड्या अंतरावर ज्या डोंगराच्या पोटांत लेणीं आहेत त्याला लागूनच असणाऱ्या टेंकडीवर निजामसरकारचें 'सॅनिटेरिअम' अथवा आरोग्यस्थान आहे. ही जागा फार हवाशीर असून निजामसरकारांनीं येथें मोठमोठे बंगले बांधले आहेत. या उंच प्रदेशावरून खालचा देखावा फार सुंदर आणि रमणीय दिसतो. वेरूळचीं लेणीं पहावयास येणारे युरोपियन लोक येथेंच येऊन राहतात. कित्येक लोक खुद्द लेण्यांतच जाऊन राहतात. वेरूळ गांवापासून लेणीं सुमारें एक मैलाच्या अंतरावर आहेत.

वेरूळचीं लेणीं ज्या डोंगरांत कोरिलीं आहेत तो फार उंच नाहीं. हा डोंगर दक्षिणोत्तर असून त्याचा आकार चंद्रकोरीप्रमाणें अथवा धनुष्याच्या आकृतीप्रमाणें आहे. या डोंगराच्या मध्यभागच्या उंचीपेक्षां दक्षिणोत्तर दोन्ही बाजूंस उंची जास्त होत गेली आहे. यांत कोरलेलीं सर्व लेणीं पश्चिमाभिमुख आहेत. हीं लेणीं वाटेल तेव्हां वाटेल त्यास पहावयास मोकळीक आहे. लार्ड कर्झन साहेबांची स्वारी हीं लेणीं पहावयास गेली होती. तेव्हांपासून लेण्यांच्या बाहेर एक चौकी बसविली असून दरमाणसीं माफक दस्तुरी द्यावी लागते. तिच्या उत्पन्नाचा विनियोग लेण्यांच्या साफस-

फाईकडे करण्यांत येतो. ह्या दस्तुरीचा लिलांव दरसाल चारपांचशें रुपयांस होतो. दरमाणसीं एक पैशाप्रमाणें निदान किती माणसें दरसाल लेणीं पाहण्यास जात असतील याचा अंदाज या रकमेवरून सहज काढितां येण्यासारिखा आहे. गव्हर्नर, गव्हर्नर जनरल ह्यांसारखे बडे अधिकारी व युवराज प्रिन्स आफ् वेल्स ह्यांसारखे राजपुरुष लेण्यांचें दर्शन घेण्यास जात असल्यामुळें अलीकडे लेणीं स्वच्छ ठेवण्यांत येतात.

डोंगराच्या उत्तरेकडील शेवटाला जें लेणें आहे तें पारसनाथ या नांवानें प्रसिद्ध आहे. आणि दक्षिणेकडील शेवटच्या लेण्यास धेडवाडा हें नांव आहे. या दोन्ही लेण्यांमध्यें सरासरी मैल सव्वामैलाचें अंतर आहे. पारसनाथाचें लेणें सर्व लेण्यांत जास्त उंचीवर आहे. ह्मणजे पांच सहाशें फुटांच्या उंचीवर तें असावें. बाकीचीं लेणीं या दोहोंच्या मध्यें एकमेकांपासून कमजास्त अंतरावर व उंचीवर आहेत. जसजसा डोंगराच्या पोटांत खोदण्यास योग्य खडक कारागिरांना सांपडला तसतसें त्यांनीं काम केलें असावें असें दिसतें.

लेणीं पाहावयास गेलें असतां प्रत्येक लेण्याची माहिती सांगणारे पिढीजाद वतनदार तेथें बसलेले असतात. ते जी माहिती देतात ती वस्तुस्थितीशीं पुष्कळदां जुळत नाहीं. आपण जो पाढा वाचितों तो कितपत पुराणाला अथवा भिंतीवर रेखाटलेल्या चित्रांला धरून आहे याविषयीं ते मुळींच फिकीर बाळगीत नाहींत. तुह्मी जी हकीकत सांगतां तिला कांहीं आधार आहे काय, असें त्यांस विचारिलें असतां, आमचे बाप आजे असेंच सांगत आले असें ह्मणून ते वेळ मारून नेतात, आणि नंतर हळूहळू आपलें वाक्पांडित्य आंखडतें घेतात.

सर्व लेणीं लक्ष्यपूर्वक पाहण्याची ज्यास इच्छा आहे, त्यानें दक्षिणेकडील लेण्यांकडून आरंभ करावा. कारण उत्तरेकडून पाहत आल्यास मग सर्व लेणीं पाहण्याची इच्छा राहणार नाहीं. कारण, वरवर पाहणाऱ्यास दक्षिणेकडील लेण्यांचा साधेपणा पाहून कंटाळा येण्याचा संभव आहे. शिवाय प्रथम बौद्ध लोकांनीं लेणीं कोरिलीं व त्यांचें अनुकरण ब्राह्मण आणि जैन-

धर्मानुयायांनीं केलें ही गोष्ट आतां बहुतेक सर्वांस मान्य झाली आहे. या दृष्टीनें पाहिलें असतां दक्षिणेकडील लेणीं सर्व लेण्यांत फार प्राचीन होत. यासाठीं शेंड्यापासून आरंभ न करितां बुडापासून करावा हें योग्य आहे. हीं लेणीं जरी साधीं आहेत, तरी वगळण्यासारखीं नाहींत. तीं पाहूं नयेत, ब्राह्मणांनीं त्यांत जाऊं नये असें तेथच्या ब्राह्मणांचें व गुरवांचें ह्मणणें असतें. परंतु त्याकडे लक्ष न देतां तीं अवश्य पहावीं. पाहिल्यानंतर त्यांत विटाळ मानण्यासारखें अथवा त्यांजकडे दुर्लक्ष्य करण्यासारखें कांहीं नाहीं, हें स्पष्ट दिसून येतें. एकाकाळीं बुद्धाविषयीं आमची तिरस्कारबुद्धि किती जबर होती, हें या वेडगळ समजुतीवरून उघड होतें. वेडगळ समजुती नाहींतशा होण्यास फार प्रयास पडतात, असें जें ह्मणतात तें खोटें नाहीं.

---

## घेडवाडा—महारवाडा.

कांहीं लेण्यांस तोंडास आलीं तीं वेरूळच्या रहिवाशांनीं नांवें दिलेलीं आहेत. हीं नांवें पूर्वापार चालत आलेलीं आहेत, हें उघड आहे. तथापि, तीं देण्यांत देणारांच्या समजुतीचा बराच भाग असावा. कारण घेडवाडा, सुतारझोंपडी या नांवास सार्थकता आणण्यासारखें त्या लेण्यांत कांहीं विशेष नाहीं. घेडवाडा हा थेरवाडा ह्या शब्दाचा अपभ्रंश होय. थेर ह्मणजे वृद्ध. बौद्ध धर्मानुयायी वृद्धांची रहाण्याची जागा तो थेरवाडा होय. त्या थेरवाड्याचा घेडवाडा झाला. घेडवाड्यांतील पहिल्या लेण्यास महारवाडा ह्मणतात. हें नांव कां पडलें आहे याची मीमांसा करणें कठिण आहे. केवळ बौद्ध धर्माविषयीं तिरस्कार, याशिवाय दुसरें कोणतेंही कारण नसावें. तो व्यक्त करण्याकरितां महारवाडा हें नांव प्रचारांत आणून लोकांनीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलेलें दिसतें. या लेण्यांत शिरण्यास चांगला मोठा हत्ती आंत सहज जाईल एवढा जंगी दरवाजा आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस द्वारपालांचीं चित्रें आहेत. आंत शिरल्यानंतर डाव्या हातास भिंतींत कोरलेलें माया देवीचें चित्र प्रथम नजरेस पडतें. त्यालाच लागून बुद्धाचीं चार चित्रें

आहेत. चित्रें ह्मणण्यापेक्षां मूर्ति आहेत असें ह्मटलें पाहिजे. या लेण्याला एक पांच खणांची ओवरी असून प्रत्येक खणांत एकेक मूर्ति आहे. या मूर्तींच्या गळ्यांत जानव्यासारखें कांहीं कोरलेलें आहे. लेण्याच्या मध्यभागीं एक मोठी मूर्ति असून तिच्या दोन्ही बाजूंस दहा फूट उंचीचे धिप्पाड असे द्वारपाल आपली कामगिरी मोठ्या दक्षतेनें बजावीत आहेत, असें त्यांच्या मुद्रेकडे पाहिलें ह्मणजे वाटतें. योगशास्त्रांत जीं अनेक आसनें वर्णिलीं आहेत त्यांपैकीं एक आसन घालून सर्व मूर्ति बसल्या आहेत असें या लेण्यांत दाखविलें आहे. प्रत्येक मूर्ति मांडी घालून बसलेली असून दोन्ही हात छातीवर ठेविले आहेत. उजव्या हाताची करांगुली आणि आंगठा या दोन बोटांत डाव्या हाताची करांगुली धरून प्रत्येक मूर्ति समाधि लावून ध्यान करीत आहे, असें दाखविलें आहे. लेण्यांतील मध्यभागच्या मुख्य मूर्तीसमोर सभामंडपासारखें दालन आहे. ह्या दालनाला बारा खांब आहेत. खांब समांतर, सारख्या जाडीचे व एकाच उंचीचे असून त्यांजवर नकशीकाम खोदलेलें आहे. सभामंडपाचें छत अगदीं साधें आहे. मुख्य मूर्तीच्या डाव्या बाजूस एक लहानशी खोली असून सभामंडपाच्या दोन्ही बाजूंस ओवऱ्या अगर सोपे आहेत.

---

## धेडवाडा.

महारवाड्यांतून निघून पाहणारा शेजारच्या धेडवाड्यांत शिरतो. या लेण्याचे दरवाजाजवळील खांब पडले आहेत. या लेण्यांत आणि पहिल्या लेण्यांत रचनेच्यासंबंधानें थोडा फरक आहे. पडलेले खांब उचलून एकीकडे टाकून दिलेले आहेत. सभामंडपाच्या सभोंवार तिन्ही बाजूंस खोल्या आहेत. प्रत्येक खोली सुमारें दोन खणांच्या आकाराची, अशा एकंदर बारा खोल्या आहेत. राहण्याकरितां त्यांची योजना केली असावी हें स्पष्ट दिसतें. मध्यभागीं एक भव्य आणि प्रचंड अशी मूर्ति आहे. लेण्याजवळ पाण्याचें टांकें आहे. द्वारपालांपैकीं एकाच्या डोक्यावरील टोपींत बुद्धाची बसलेली मूर्ति खोदलेली आहे, व दुसऱ्याच्या डोक्यावर एक अर्धवर्तुलाकृति चित्र

आहे. या लेण्यांत नवग्रहांच्या मूर्ति खोदलेल्या आहेत. या लेण्याचे खांबावरील नकशींत आणि महारवाड्यांतील खांबावरील नकशींतही थोडा फरक आहे. या लेण्यास कोणी देववाडा असेंही ह्मणतात. पूर्वीं हें नांव विशेष प्रचारांत होतें.

---

## दुसरा महारवाडा.

धेडवाड्याच्या पुढें जें तिसरें लेणें लागतें त्यासही महारवाडा हेंच नांव आहे. मागील दोन लेण्यांप्रमाणेंच याही लेण्याची रचना आहे. आंत गेल्यावर डाव्या हातास जें चित्र दृष्टीस पडतें, तें जटाधारी ऋषीच्या मूर्तीप्रमाणें आहे. या मूर्तीच्या गळ्यांत जानवें आहे. मध्यभागीं जी मुख्य मूर्ति आहे, ती बुद्धाचीच असून तिच्या दोन्ही बाजूंस दोन खोल्या आहेत. लेण्यांत रहाणाऱ्यांस एकांतपणें निवांत अशा ठिकाणीं ध्यानस्थ बसण्यास सांपडावें, व कोणत्याही प्रकारचा व्यत्यय येऊं नये, अशी स्वतंत्र जागा असावी असा या खोल्या करण्याचा उद्देश दिसतो. बुद्धाच्या मूर्तीची बैठक आणि ध्यान व हातांची ठेवण मागील मूर्तीप्रमाणेंच आहे. तिच्या डोक्यावर कोंपऱ्यांत एक पुरुष आणि एक स्त्री अशीं दोन चित्रें खोदलेलीं आहेत. पुढें चढून गेल्यावर एक मोठा दिवाणखाना लागतो. त्याचें छत साधें आहे. या दिवाणखान्यासारख्या दिसणाऱ्या भव्य सभामंडपाचे मध्यभागीं बुद्धाची मूर्ति आहे. या मूर्तीच्या शरीरावर आच्छादन ह्मणून कांहीं तरी वस्त्र आहे असें दाखविण्यांत आलें आहे. या वस्त्राचा डाव्या हातावर आलेला सोगा त्याच हाताच्या आंगठ्यांत आणि त्याजवळील बोटांत धरून त्याच हाताची करांगुली उजव्या हाताच्या बोटांनीं धरली आहे असें स्पष्ट दिसतें. या दिवाणखान्यांतील खांबाचे कामांत कारागिरांनीं जास्त करामत दाखविली आहे. दिवाणखान्याची रुंदी ५६ फूट आणि लांबी ११० फूट आहे, यावरून तो केवढा असावा याचें अनुमान सहज करितां येण्यासारखें आहे. त्याच्या सभोंवतीं मागील लेण्यांतील खोल्यांच्या आकाराच्याच बावीस खोल्या आहेत.

खालीं जमिनीवर ठिकठिकाणीं उखळ्यांसारखे खोलगे पडलेले आहेत. मध्यभागीं सर्व दिवाणखान्याच्या लांबीचे समांतर व सारख्या उंचीचे असे दोन ओटे आहेत. ही सर्व योजना कोणत्या उद्देशानें केली असावी याचें नक्की अनुमान करितां येत नाहीं. सभोंवतीं खोल्या असल्यामुळें त्या राहण्याच्या जागा असून हें मधील दालन जेवणाकरितां किंवा विद्यार्थ्यांनीं एकत्र बसून अध्ययन करावें याकरितां योजिलेलें असावें, अशी कल्पना केल्यास हरकत नाहीं. जमिनीला खोलगे वरून पाणी पडल्यामुळें पडले असावे, असें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. कारण, ते बहुधा एक सांच्याचे आहेत. हल्लीं मोठमोठ्या पाठशाळांतल्या विद्यार्थ्यांना रहाण्याच्या सोई केलेल्या आहेत, तोच हेतु यांतही असावा असा तर्क बांधण्यास कांहीं हरकत नाहीं. विद्याभ्यास करावयाचा, मग तो कोणत्याही शास्त्राचा असो, त्याला कामधंदेवाल्या लोकांचा फारसा उपसर्ग लागूं नये, असें निवांत स्थळ असणें अवश्य आहे. त्याशिवाय चित्ताची एकाग्रता होत नाहीं व विद्येची खरी अभिरुचि उत्पन्न होत नाहीं. विद्या संपूर्ण होईपर्यंत विद्यार्थ्यानें गुरूपाशींच राहिलें पाहिजे अशी फार प्राचीन काळापासून पद्धति आहे. गुरूंनीं वनांत आश्रम बांधून राहावें व त्यांजपाशीं शिष्यांनीं वास्तव्य करून विद्या संपादन करावी, ब्रह्मचर्य पाळावें, व अध्ययन संपल्यावर गुरूंची आज्ञा घेऊन स्वगृहीं परत आल्यावर गृहस्थाश्रमी व्हावें असा पूर्वींचा क्रम असे. या गुरुशिष्यसांप्रदायाचें अनुकरण करून बुद्धधर्माच्या अनुयायांनीं आपल्या धर्माच्या प्रसारासाठीं मोठमोठ्या पाठशाळा स्थापन केल्या असाव्या असें मानण्यास इतिहासदृष्टयाही पुष्कळ आधार आहे. यावरूनच या ठिकाणीं अशा प्रकारची एक मोठी पाठशाळा असावी असें अनुमान निघतें. याच्यापुढें जीं दोम लेणीं लागतात त्यांची रचना पहिल्या लेण्यासारखीच असून मध्यभागीं बुद्धाची मूर्ति आहे. विशेष वर्णन करण्यासारखें त्यामध्यें कांहीं नाहीं.

येथून पुढें जें लेणें लागतें त्यांत बारा खोल्या आहेत. लेण्याला फक्त चार खांब आहेत. मध्यभागीं खोलीमध्यें बुद्धाची मूर्ति आहे. ही खोली चारी बाजूंनीं मोकळी आहे. त्यामुळें सभोंवतीं प्रदक्षिणा

घालण्याची सोय आहे. ही सोय येथपर्यंत वर्णन केलेल्या लेण्यांतून नाहीं. बाकीच्या लेण्यांतील खांबांत आणि यांतील खांबांत एक मोठा फरक दिसून येतो. तो असा कीं, या लेण्यांतील खांबांस एका बाजूकडून जवळच्याच दुसऱ्या बाजूस आरपार अशीं तिरपीं भोंकें पाडलेलीं आहेत. कांहीं तरी त्यांत अडकवून ठेवण्याकरितां तीं पाडलेलीं असावीं असें दिसतें. मग त्यांचा दुसरा कांहीं उपयोग लेण्यांत राहणारे त्या वेळचे लोक करीत असल्यास तो कळण्यास आज साधन नाहीं.

येथपर्यंत वर्णन केलेल्या सर्व लेण्यांचा समावेश वेरूळ येथील लोक महारवाडा आणि धेडवाडा या नांवाखालीं करितात. तीं नांवें देण्यास कांहींही सयुक्तिक कारण नाहीं, हें वर निर्दिष्ट केलेंच आहे. व हीं नांवें विनाकारण आणि अस्थानीं आहेत, अशी धेडवाडा पाहणें संपल्यावर पाहणाराची खात्री होते. कदाचित् कांहीं वर्षांपूर्वीं या लेण्यांत धनगर लोक शेळ्यामेंढ्या कोंडीत असत व त्यामुळें तेथें अतिशय घाण होत असे, आणि महारवाडा ह्मणजे गलिच्छ लोकांचें राहण्याचें ठिकाण या समजुतीनें तें नांव त्यांस दिलें असावें. हल्लीं लेणीं अगदीं स्वच्छ असल्यामुळें जरी तीं महारवाडा असलीं तरी विटाळ होण्याची अगर दुर्गंधि येण्याची कोणत्याही प्रकारें भीति न वाळगतां पाहणारानें बेलाशक त्यांत शिरावें. तसें केलें असतां तेथील गुरव अथवा भिक्षुकब्राह्मण यांचें आपण ऐकिलें नाहीं याबद्दल पश्चात्ताप मानण्याची पाळी त्याजवर कधीं येणार नाहीं! इतका वेळ महारवाडा हिंडल्यावर आतां आपणांस प्रसन्न मनानें व बाकीचीं लेणीं पाहण्याच्या प्रबळ उत्कंठेनें त्याच्या बाहेर पडण्यास हरकत नाहीं. महारवाड्यांतून निघावें तों थेट विश्वकर्म्याच्या झोंपडींत शिरावें.

---

## विश्वकर्मा.

या लेण्यास साधारणपणें विश्वकर्म्याची झोंपडी अथवा सुतारझोंपडी असें ह्मणण्याचा प्रघात पडला आहे. विश्वकर्मा जग निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाचा नातू होता, अशी समजूत आहे. तो जातीचा सुतार आहे असें



विश्वकर्मा ऊर्फ सुतारझोंपडी.

मानिलें असल्यामुळें सुतारझोंपडी हें नांव ह्या लेण्यास दिलें आहे. शेजारचीं लेणीं कोरिल्यानंतर स्वतःस राहण्याकरितां त्यानें हें लेणें कोरिलें. वेरूळच्या इतर लेण्यांहून या लेण्याची रचना भिन्न आहे. या लेण्याचें वरचें छत घुमटवजा असून सुमारें वितीवितीच्या अंतरावर सर्व घुमटांस कमानी आहेत. कमानी आहेत असें फक्त हेंच लेणें आहे. एखाद्या नावेला अथवा जहाजाला बळकटी आणण्याकरितां ज्याप्रमाणें लांकडी कमानी ठोकलेल्या असतात, त्याप्रमाणेंच या लेण्याच्या डोमवजा छताला समांतर अशा कमानी दिलेल्या आहेत, असें दिसतें. या कमानींमुळें वरील भागाला साध्या डोमापेक्षां ज्यास्त शोभा आली आहे.

हें लेणें सुंदर आहे. त्यांत कमीपणा अथवा गौणत्व दाखविण्यास कोठें जागाच नाहीं, व लक्ष्यपूर्वक अवलोकन करण्यास अगदीं योग्य असें आहे. या लेण्यांत पाहणारानें कांहीं वेळ घालविला, तर कंटाळा तर येत नाहींच, पण उलट मन रमून जातें, अशी या लेण्याच्या आंगीं शक्ति आहे, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति केल्याचा आरोप कोणासही लादतां येणार नाहीं. या लेण्याचें काम असें आहे कीं, त्याच्या वैचित्र्यानें त्याला एक प्रकारची स्वतंत्र तऱ्हेची शोभा आली आहे. हें लेणें खोदण्यास लागलेल्या श्रमाचाच जर फक्त विचार केला, तर त्याच्या कर्त्याच्या उद्योगाची तारीफ केल्याशिवाय राहवत नाहीं. याच्यापेक्षांही ज्यास्त सुंदर लेणीं वेरुळास आहेत, ही गोष्ट जरी आपण क्षणभर विसरून गेलों, तरी फक्त एवढेंच लेणें अस्तित्वांत असतें, तरी कारागिरीच्या कामांत त्यानें आपल्या देशाची कीर्ति खरोखर कायम राखिली असती, यांत बिलकुल संशय नाहीं. हें पालथ्या होडीच्या आकृतीचें लेणें पाषाणमय खडकांत कोरीत कोरीत १३० फूट आंत डोंगराच्या पोटांत नेलें आहे. त्याचें कमानीच्या आकाराचें अथवा अर्धवर्तुलाकृति छत, अष्टपैलू खांबांच्या रांगा व पुढील भागावरील नकशीचें काम, हीं त्याच्या शोभेंत सौंदर्याची विशेष भर घालतात. वेरुळास अशा आकाराचें लेणें हेंच कायतें आहे. कार्ली आणि कानेरी येथें मात्र या लेण्यासारखीं लेणीं आहेत.

या लेण्याच्या पुढें मोकळी जागा असून तिजवर खडकांतच खोदलेली एक भिंत उभी आहे. लेण्याचा पुढील भाग फार सुंदर नकशीनें खोदलेला आहे. या लेण्याच्या चित्रावरून त्याच्या आकाराची कल्पना होईल. पुढील दोन खांबांतून पाहिलें असतां लेण्याचा मध्यभाग अगदीं स्पष्टपणें दिसतो.

लेण्याच्या मध्यभागीं जी भव्य आणि विशाळ मूर्ति आहे ती इतर मूर्तींप्रमाणें नसून खालीं पाय सोडून बसलेली आहे, व उजव्या हातानें डाव्या हाताची करांगुळी तिनें धरली आहे, व ध्यानस्थ बसल्यासारखे डोळे लावून घेतले आहेत. बुद्धाच्या डोक्यावर जी रुंद कमान आहे तींत स्त्रीपुरुषांचीं चित्रें खोदलेलीं आहेत. गाभाऱ्याच्या दोहों बाजूंस जे द्वारपाळ उभे आहेत, त्यांचीं शरीरें भूषणांनीं विभूषित केलेलीं आहेत. अशीं भूषणें मुख्य मूर्तीच्या ह्मणजे बुद्धाच्या आंगावर कोठेंही नाहींत. या द्वारपाळांपैकीं डाव्या हातच्या द्वारपाळाच्या हाताला गुंडाळून दोन तीन वेढे घातल्यासारखें एक दोरखंड आहे. उजव्या हातच्या द्वारपाळानें आपल्या डाव्या खांद्याला तिरकमटा अडकविला असून दोघांच्याही गळ्यांत जानवीं आहेत. हातांत कडीं व गळ्यांत माळा आहेत. डोक्यांवर उंच मुकुट आहेत. या वर्णनावरून व मुख्यत्वें त्यांच्या गळ्यांतील जानव्यांवरून या ब्राह्मणांच्या मूर्ति असून त्यांनीं बुद्धाच्या द्वारपाळाचें ह्मणजे सेवकाचें काम पत्करिलें आहे, असें दाखविण्याचा हेतु असला पाहिजे. यावरून असें अनुमान निघतें कीं, जेव्हां सर्वत्र कर्मठपणा वाढून ब्राह्मण देवांसही झुगारून देऊन स्वतः भूदेव बनले, तेव्हां ब्राह्मणधर्माचीं खरीं सोज्ज्वळ तत्वें लुप्तप्राय होऊन किरकोळ गोष्टींचें स्तोम माजलें, आणि धर्म हा एक सवदाचा जिन्नस होऊन बसला. अशा वेळीं बुद्धानें आपलें धर्ममत स्थापन केलें व त्याचा प्रसार करण्याकरितां त्याच्या अनुयायांनीं दीर्घ प्रयत्न केले. अंधकारांतून प्रकाशांत, अज्ञानांतून ज्ञानाकडे जाण्याची मनुष्याची साहजिक प्रवृत्ति असल्यामुळें, खऱ्या धर्माची ओळख साधारण जनसमूह

विसरला असल्यामुळें बौद्धधर्म सकृद्दर्शनीं भिन्न वाटण्यासारखा आर्यधर्मा-विरुद्ध नसल्यामुळें व त्याची उत्पत्ति सनातन आर्यधर्मापासूनच झाली असल्यामुळें, पुष्कळ ब्राह्मणांनीं त्या धर्माचा अंगीकार केला असावा व कित्येकांनीं धर्मप्रचारकांचें शिष्यत्वही पत्करिलें असावें हें उघड आहे.

विश्वकर्मा हें नामाभिधान पावलेली बुद्धाची मूर्ति पाहिल्याबरोबर नग्न आहे असें वाटतें. परंतु थोडी बारीक नजर करून पाहिलें असतां त्या मूर्तीच्या डाव्या हाताखालीं कपड्याचा पदर लोंबतो आहे असें दिसतें. हा पदर मूर्तींत दिसावा तितका स्पष्ट दिसत नाहीं. त्याकरितां फारच लक्ष्यपूर्वक पाहिलें पाहिजे. विश्वकर्म्याच्या डोक्यावर केंस असून तो बोडका आहे असें वाटतें. परंतु तो एक प्रकारचा लहानसा मुगुट असावा. कारण, त्याच्या मधून थोडे केंस वर आल्यासारखें दाखविलें आहे. जर नुसतेच कुरळे केंस डोक्यावर असते, तर डोकें हल्लींच्या स्थितीहून निराळें दिसलें असतें.

ह्या लेण्याची लांबी सुमारें पन्नास पंचावन हात, व रुंदी तीस हात असून, उंची सुमारें चार पुरुष आहे. लेण्याच्या बाहेरच्या दरवाजापासून पाहिलें तर तें फार विस्तृत दिसतें. लेण्याला एकंदर अष्टकोनी अठ्ठावीस खांब आहेत. या खांबांच्या वरच्या बाजूस सभोंवार कनातीसारखी जागा सोडलेली आहे. तींत स्त्रीपुरुषांचीं चित्रें खोदलेलीं आहेत. या जागेच्या वरच्या बाजूस निरनिराळे विभाग पाडलेले खण असून त्यांत बुद्धाची बसलेली मूर्ति आहे. तिच्या भोंवतीं चार चार परिचारक आहेत. त्यांच्यावर एक पुरुषाची तर एक स्त्रीची अशा मूर्ति खोदलेल्या असून त्यांच्या पाठीवर वरील छताच्या रिपांचा सर्व भार पडला आहे व तो त्यांनीं सहज लीलेनें तोलून धरला आहे, असें दाखविलें आहे. या लेण्याला दोन सज्जे आहेत. एकांतून लेण्याचा आंतील भाग दृष्टीस पडतो व एकांतून पुढील भाग दिसतो. पुढच्या सज्जांत जावयास चांगले जिने आहेत.

लेण्याच्या पुढच्या भागाच्या डावे हाताला बुद्धाचे उभ्या मूर्तींच्या

वरच्या बाजूस एका लहानशा चौकोनी जागेंत शिवगणांशीं सादृश्य पावणाऱ्या नऊ लहान मूर्ति आहेत. प्रत्येक मूर्ति लहान, ठेंगणी ठुसकी ढेरपोटी दाखविली असून तिच्या शरीरावर कांहीं वस्त्र आच्छादनासाठीं आहे असेंही स्पष्ट दिसतें. या मूर्तींपैकीं तीन मूर्ति मंडपीस आधार देत आहेत ह्मणजे ती वर तोलून धरीत आहेत व बाकीचे निरनिराळीं वाद्यें वाजविण्यांत गुंग होऊन गेले आहेत. एक सूर वाजवितो तर दुसऱ्यानें शंखनाद चालविला आहे, तिसरा वीणा वाजवीत असून चवथा मृदंगावर थाप देऊन राहिला आहे. या देखाव्याच्या वरच्या बाजूस एक पुरुष एका स्त्रीला प्रेमानें आलिंगन देत आहे, असें जोडपें खोदलेलें आहे.

अलीकडे जे प्राचीन संस्कृत ग्रंथ उपलब्ध झाले आहेत, त्यांत शिल्पशास्त्रावरही कांहीं ग्रंथ आहेत. त्या ग्रंथांत फार जुना असा एक ग्रंथ आहे, त्याचा कर्ता विश्वकर्मा नांवाचा एक शिल्पकार होता. कदाचित् या शिल्पकारानेंच हें लेण्याचें खोदींव काम केलें असावें व त्यावरून या लेण्याचें नांव विश्वकर्मा पडलें असावें.

ज्यांना तत्वदृष्टीनें पाहण्याची संवय झाली आहे, त्यांनीं या लेण्यासंबंधीं एक निराळी कल्पना बसविली आहे. या लेण्यावरून परमात्म्याच्या स्वरूपाची कल्पना यावी, हा हें लेणें कोरण्यांत उद्देश आहे, असें त्यांचें मत आहे. वर्तुलाकार वेदी हें अनादि अंतहीन अशा नित्यत्वाचें दर्शक चिन्ह होय. कमानींनीं बनविलेलें छत ह्मणजे सर्वत्र भरून उरलेलें आकाश होय. आणि सर्व लेणें ह्मणजे परमात्म्याच्या, केवळ एकमेवाद्वितीय परमेश्वराच्या, जग निर्माण करणाऱ्या शक्तीचें दर्शक आहे. ब्रह्मा, बुद्ध आणि इतर देवता ह्मणजे त्या परमेश्वराच्या एकेका शक्तीचे सूचक अवतार होत!

---

## दोन ताळ अथवा दुमज्या घर.

सुतारझोंपडींतून बाहेर पडलें ह्मणजे एकमेकांस लागून अशीं दोन लेणीं लागतात. त्यांस तीन ताळ अथवा तीन लोक आणि दोन ताळ

अथवा दुख्याघर असें ह्मणतात. दुख्याघर या नांवावरून लेण्यांस, कांहीं तरी बादरायण संबंध जुळवून इच्छेस येईल तशी नांवें दिलीं आहेत, अशी पक्की खात्री होते. विश्वकर्म्याच्या लेण्यांतील मुख्य मूर्तीच्या आकारावरून विश्वकर्म्याच्या बोटांतून धार वाहत आहे, असें दिसतें. त्यावरून अशी कल्पना बसविण्यांत आली आहे कीं, सर्व लेण्यांचा उत्पन्नकर्ता जो विश्वकर्मा त्यानें सर्व लेणीं खोदल्यानंतर स्वतःस राहण्याकरितां तीन ताळ या लेण्याच्या तोडीचें एक लेणें कोरण्याचें काम सुरू केलें. परंतु त्याचा उद्देश सिद्धीस जाऊं नये, असा ईश्वरी संकेत होता. त्यामुळें दुसऱ्या मजल्याचें काम चाललें असतां त्याची करांगुळी कापली व तिच्या असह्य वेदनांमुळें त्याला तिसरा मजला खोदण्याचा आपला उद्देश मनांतले मनांत तसाच जिरू द्यावा लागला ! हें लेणें खोदीत असतां तो दुखणाईत झाला, ह्मणून ह्याचें नांव दुख्याघर. पुढें तो बरा झाल्यावर या गोष्टीचें स्मारक कायमचें रहावें, ह्मणून त्यानें आपली स्वतःची मूर्ति विश्वकर्मा या लेण्यांत खोदिली व जी करांगुळी कापली होती, ती हातांत धरून तिच्यांतून रक्ताची धार जमिनीवर चालली आहे, असें दाखविलें. विश्वकर्म्याच्या मूर्तीचें स्वरूप हाच या गोष्टीस आधार आहे, हें उघड आहे. योगशास्त्रांत ध्यानस्थ बसण्याचीं जीं अनेक आसनें वर्णिलीं आहेत, त्यांपैकीं एक विश्वकर्म्याच्या मूर्तींत दाखविण्याचा हेतु आहे, असें योगशास्त्रज्ञांचें ह्मणणें आहे ! तेव्हां त्यांच्या ह्मणण्यास मान द्यावा किंवा वरील गोष्टीवर भरंवसा ठेवावा, हें ज्याचें त्यानें ठरवावें हें बरें!

दुख्याघर हें लेणें साधें आहे. त्यांत नकशी काम नाहीं किंवा त्याला सौंदर्य आणण्याचाही कांहीं प्रयत्न केलेला नाहीं. पहिल्या मजल्यांत मध्यभागीं बुद्धाची मूर्ति असून ती पद्मासन घालून बसली आहे. बुद्धाच्या मूर्तीच्या दोन्ही बाजूंस एकेक खोली आहे. या लेण्याचा पुढील भाग शंभर फुटांपेक्षां ज्यास्त लांब आहे. या लेण्यांतील मुख्य मूर्तीस भरतशत्रुघ्नही ह्मणतात ! तें कां ? याचें सयुक्तिक कारण मात्र कोणासही सांगतां येत नाहीं. पहिल्या ताळांतून दुसऱ्या ताळांत ह्मणजे मजल्यांत जाण्यास डाव्या हाताला जिना

आहे. त्याला लांब रुंद अशा प्रशस्त चवदा पायऱ्या आहेत. या जिन्यानें चढून वर गेल्यावर दुसरा मजला लागतो. या मजल्याच्या मध्यभागीं मागच्या बाजूस तीन खोल्या असून तिहींमध्येंही पद्मासन घालून बसलेल्या बुद्धाच्या मूर्ति आहेत. तिन्ही मूर्ति भव्य आहेत, हें सांगावयास नकोच. या लेण्यांतील, नव्हे, या मजल्यांतील खांबांवरील खोदींव काम ज्यास्त नकशीदार आहे. दुखणाइताच्या घरांत साधारणपणें त्याच्या आप्तइष्टमित्रांखेरीज इतरांना बसण्याचा कंटाळा येतो. तेव्हां, वाचकहो, येथें फार वेळ न थांबतां आपण या दुख्याघराच्या दुसऱ्या मजल्यांतूनच परस्पर तीन ताळांत जाऊं.

---

## तीन ताळ.

तीन ताळ हें लेणें तीनमजली आहे. त्यावरून त्यास हें नांव पडलें आहे. तिन्ही ताळांला निरनिराळीं नांवें आहेत. पहिल्या ताळाचें नांव पाताळ-लोक, मधल्या ह्मणजे दुसऱ्या ताळाचें नांव मृत्युलोक, आणि सर्वांत वरच्या तिसऱ्या ताळाचें नांव स्वर्गलोक. लेण्याला तीन मजले आहेत व हिंदुलोकांत मुख्यतः तीन लोक मानिले आहेत. या गोष्टीशीं या तिन्ही ताळांचा संबंध बरोबर जुळवितां येतो व कल्पना ठीक बसते यावरून स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ अशीं नांवें दिलीं गेलीं आहेत, यापलीकडे त्यांत कांहीं ज्यास्त हेतु दिसत नाहीं. लेण्याच्या बाह्यस्वरूपावरून अथवा आंतील रचनेवरून त्या नांवास सार्थकता आणण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं. कारण, या तिन्ही लोकांविषयीं लोकांमध्यें ज्या कल्पना आहेत, अथवा त्यांचीं पुराणांतरीं जीं वर्णनें आहेत, त्यांचें निदर्शक असें त्यांत कांहीं नाहीं. उलट तिहींतील काम बहुतेक सारखेंच असून तिन्ही मजल्यांत मुख्यस्थानीं बुद्धाचीच मूर्ति आहे. तेव्हां हीं नांवें त्यांस मुळींच शोभत नाहींत असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं.

तीन ताळ हें लेणें दृष्टीस पडल्याबरोबर त्याचें तें अवाढव्य काम पाहून मनावर प्रथम इतका कांहीं विलक्षण परिणाम होतो कीं, माणूस किंचित् गुंग-ल्यासारखा होऊन नुसतें स्तब्ध उभें राहून पाहण्याकडे त्याची थोडा वेळ

प्रवृत्ति होते. हें अगदीं साहजिक रीत्या घडतें. कैलासाला त्यांतील मूर्तींमुळें, सज्जांनीं, सभोंवतालच्या विस्तृत पटांगणानें आणि सुंदर खोदींव कामानें सर्व लेण्यांत श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे, ही गोष्ट खरी आहे; तथापि तीन ताळ आपल्या जंगी खांबांनीं, विशाळपणानें आणि सुरेख खोदींव कामानें जणों काय आपला शेजारी कैलास याची बरोबरी करण्यास तयारी करीत आहे, असें दिसून येतें. एकंदर रचनेंत आणि बाह्य देखाव्यांत कैलासाहून हें लेणें जरी वस्तुतः भिन्न आहे, तरी पाहणारा आंत शिरल्यावर त्याचें लक्ष्य वेधून गेल्याशिवाय राहत नाहीं. गायनकलेचें यत्किंचित् ज्ञान नसावें, उलटा तिटकारा असावा, अशा माणसास दैववशात् गंधर्वाच्या तोंडीचें सुस्वर मधुर गायन ऐकावयास सांपडलें असतां त्यास त्या गाण्यांतील शास्त्रोक्त भाग ह्मणजे रागरागिण्या जरी समजल्या नाहींत, तरी आवाज किती मधुर आहे, गाणें कानास किती तरी गोड लागतें, असे उद्गार आपोआप त्याच्या मुखांतून बाहेर पडतात व आपल्या इच्छेविरुद्ध तेथें तो गायन श्रवण करीत असतो. तद्वतच पाहणाराची कांहीं अंशीं येथें स्थिति होते. तो जरी चौकसबुद्धीचा नसला, अथवा डोळे उघडे ठेवून आंधळ्याप्रमाणें जगांत फिरणारा असला, तरी ह्या लेण्यासारखें विशाळ लेणें पाहून त्याच्या मनोवृत्ति उचंबळून आल्याशिवाय राहणार नाहींत; आणि त्याच्या हातून दुसरें कांहीं झालें नाहीं तरी 'वाहवा! वाहवा!' असे उद्गार साहजिकपणें निघतील.

हीं अवाढव्य कामें अशीं विलक्षण भासतात कीं, तीं पाहत असतांना त्यांच्या बरोबरीचीं कामें जगांत कोठेंही नसतील, फार तर काय इजिप्त देशांतील ज्या मनोऱ्यांची आपण फार प्रशंसा ऐकतों, तीं सुद्धां यांच्या पुढें खुजीं दिसतील, अशी मनोवृत्ति होऊन जाते. परमेश्वरानें दृष्टि सर्वांस दिली आहे. परंतु कोणी रत्नपारखी असतो तर कोणी चकाकणाऱ्या गारगोटीला रत्न ह्मणणारा मूढ असतो. रत्नपारख्याशिवाय रत्नाची खरी किंमत कळणें कठीण असतें, त्याप्रमाणें या प्राचीन इमारतींचें खरें महत्व प्राचीनशास्त्रवेत्त्यांशिवाय अगर वाकबगार शिल्पकारांशिवाय दुसऱ्यांस यथार्थ समजणें कठीण आहे.

एखादा प्राचीन शास्त्रवेत्ता हीं लेणीं पाहून किती तरी नवी माहिती सांगूं शकेल! अथवा सृष्टींतील चमत्कारांचें अवलोकन करून शब्दसृष्टि निर्माण करण्यांत प्रवीण झालेल्या रसिक ग्रंथकाराला अलंकारिक भाषेंत वर्णन करण्याला येथें किती तरी विपुल सामुग्री सांपडणार आहे! या चमत्कारांचें अवलोकन करून त्याला आनंदाचें भरतें येऊन तो आपल्या वाचकांस उत्तम पक्वान्नांची मेजवानी दिल्याशिवाय राहणार नाहीं. 'पूर्णचंद्राचिया कोडी ( कोटी ) । वक्तृत्वा घापे कुरोंडी । तैसी आणी गोडी । अक्षरांतें ॥ सूर्यें अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची । तैशी वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी ॥ मराठींतील आद्यग्रंथकार ज्ञानेश्वर यांनीं या ओव्यांत ह्मटल्याप्रमाणें उत्तम लेखकांत सामर्थ्य असूं शकतें. अनभ्यस्तानें ती हांव न धरितां साधें ताट वाचकांपुढें मांडण्याची तयारी ठेवावी, हेंच बरें!

---

## पाताळ.

तीन ताळांतील पहिला मजला पाहण्यास आतां आपण पुढें होऊं. येथवर पहात आलेल्या लेण्यांत ज्याप्रमाणें मध्यभागीं मूर्ति आहेत, त्याप्रमाणेंच येथेंही आहे व त्यावरून ती बुद्धाचीच असावी, असें मानण्यास जागा आहे. परंतु वेरूळच्या लोकांनीं या मूर्तीला लक्ष्मी हें नांव दिलें आहे. कोणी कोणी या मूर्तीला कावेरी असेंही ह्मणतात. या मूर्तीचे बाहेरील द्वारपाळ बसलेले आहेत. या लेण्याची आकृति येथवर जीं लेणीं, आपण पहात आलों, त्यांपेक्षां निराळी आहे. या मजल्यांत मोकळी प्रशस्त जागा सोडून दहा खोल्या आहेत. मजल्याची लांबी पुढच्या बाजूनें १४२ फूट आहे. त्याला खांब पुष्कळ असून त्यांच्या एकामागें एक अशा रांगा असल्यामुळें कांहीं अंशीं आपण एकाद्या टोलेजंग धर्मशाळेंत उभे आहों असा भास होतो. येथें पिण्यास योग्य अशा सुरेख पाण्याचे हौद आहेत. पाताळांत हिंडत असतांना आपण्यांस शेष भेटला नाहीं, अथवा नाग आणि नागकन्या यांचें दर्शन झालें नाहीं, ह्मणून हळहळ मानीत आतां मृत्युलोकीं तरी आपली निराशा होणार नाहीं, या आशेनें आपण सोपानमार्गानें हळहळ तिकडे जाऊं.

---

## मृत्युलोक.

खऱ्या मानलेल्या पाताळांतून या मृत्युलोकांत येण्यास किती पायऱ्या असतील व त्या किती सुगम असतील त्या असोत ! या वेरूळच्या पाताळांतून मृत्युलोकीं जाण्यास फक्त चोवीस पायऱ्या आहेत. ह्या सुंदर जिन्याच्या बारा पायऱ्या चढून गेल्यावर डाव्या हाताला बुद्ध आणि त्याचे आठ शिष्य अशा मूर्तींचा एक चित्रपट आहे. मध्यभागीं असलेली मूर्ति बुद्धाचीच आहे. पण कांहीं वाटाडे या मूर्तीला कुबेर हें नांव देतात. या मूर्तीला हल्लीं तांबडा रंग दिलेला आहे. मूर्ति पद्मासन घालून बसलेली आहे. डाव्या हातचीं तिन्ही चित्रेंही तांबड्या रंगानें रंगविलेलीं आहेत. अगदीं पुढील सोप्याच्या मागच्या सोप्यांत जातांना दोन खांब लागतात. त्यांजवर देवनागरी लिपींत एक लेख खोदलेला आहे. अक्षरें बहुतेक बालबोधसारखीं दिसतात. परंतु त्यांची भाषा कोणती असावी, हें निवळ मराठी भाषा जाणणारांस उमगत नाहीं. इतर लेण्यांप्रमाणें मुख्य मूर्ति मध्यभागीं खोलींत बसलेली आहे. खोलीच्या बाहेर दोन जनावरांचीं चित्रें आहेत. तीं छिन्नभिन्न झालेलीं आहेत. द्वारपाल उभे आहेत. खोलीच्या समोर सहा सहा खांबांच्या अशा दोन रांगा आहेत. या मजल्याचा आकार खालील मजल्याप्रमाणेंच आहे. याला पंधरा खोल्या आहेत. याप्रमाणें मृत्युलोक केवळ रुक्ष आहे. जगांतील विविध व्यवहारांचें, अगणित घडामोडींचें, निरनिराळ्या स्थितींतील लोकसमाजांच्या स्थितींचें वगैरे निदर्शक असें येथें कांहीं नाहीं. मृत्युलोकची वस्ती क्षणभंगुर असल्यामुळें व आतां फक्त एक जिना चढून गेलें ह्मणजे स्वर्गप्राप्ति होण्याची आशा लागून राहिल्यामुळें आह्मीं मोठ्या उत्सुकतेनें तिकडे पाय काढला. वाचकांसही स्वर्गलोकाचें वर्णन वाचण्याची उत्कट इच्छा झाली असेल, तेव्हां आपण आतां जिन्याकडे वळूं.

---

## स्वर्गलोक.

मृत्युलोकांतून जिन्याच्या तेवीस पायऱ्या चढून वर गेलें, ह्मणजे तिसरा मजला लागतो. हा स्वर्गलोक होय. या मजल्यांत प्रवेश केल्याबरोबर समोर

पद्मासन घातलेली मूर्ति दिसते. या मूर्तीच्या दोन्ही बाजूंस दोन चवरीवाले आहेत. या मजल्याची लांबी शंभर फुटांपेक्षां ज्यास्त आहे व रुंदी ७२ फूट आहे. वरील छत अगदीं साधें आहे. या मजल्याची उंची सर्वत्र सारखी नाहीं. मागील भागापासून ह्मणजे जेथें मुख्य मूर्ति आहे तेथून पुढील भागाकडे ती कमी होत गेली आहे. ह्मणजे पुढचा भाग मागील भागापेक्षां थोडा ठेंगणा आहे. असें जरी आहे तरी तो बारा फूट उंचीचा आहे. या मजल्याला पन्नास मोकळे खांब आहेत व चौदा भिंतींत दाखविले आहेत. सज्जाचे खांब धरून प्रत्येक रांगेंत दहा अशा खांबांच्या पांच रांगा आहेत. प्रत्येक खांब तीन फूट ह्मणजे दोन हात जाड व तितकाच रुंद असा आहे. ते अगदीं साधे व चौकोनी आहेत. तिन्ही ताळांत हा ताळ फार सुंदर, मोठा आणि भव्य आहे. याच्या जंगी खांबांनीं, भरपूर खोदींव कामानें व विस्तृतपणानें एकंदरीनें या लेण्यास एक विशेष प्रकारचें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे, यांत संशय नाहीं.

मध्यभागीं आसन घालून बसलेल्या मूर्तीस ब्राह्मण लोक रामचंद्र हें नामाभिधान देतात. परंतु ही टोलेजंग आणि भव्य मूर्ति बुद्धाचीच असली पाहिजे, हें इतर मूर्तींशीं असलेल्या तिच्या साम्यावरून तेव्हांच लक्षांत येतें. ही मूर्ति अशा रीतीनें मांडी घालून बसली आहे कीं तिच्या दोन्ही पायांचे तळवे दिसतात. एक हात मांडीवर ठेविला असून दुसरा गुडघ्यावर ठेविला आहे. मूर्ति नग्न असून अंगावर कांहीं देखील भूषणें नाहींत. तिला तांबडा रंग दिलेला आहे. रंगानें मूर्तीच्या गळ्यांत एक माळ आहे असें दाखविलें आहे. या मूर्तीच्या सभोंवार कमळाच्या फुलांवर बसलेलीं अशीं स्त्रियांचीं चित्रें कोरलीं आहेत. प्रत्येक स्त्रीच्या मस्तकावर एकेक बुद्धाची बसलेली मूर्ति आहे. येथवर पहात आलेल्या मूर्तींपेक्षां येथील मूर्तींचा देखावा भिन्न व चित्ताकर्षक आहे.

उजव्या हाताला सात मूर्तींचा एक मेळा आहे. या मूर्तींनीं आपले हात मांड्यांवर ठेविले नसून एका हाताचीं बोटें दुसऱ्या हाताच्या बोटांत घालून दोन्ही हात छातीवर धरलेले आहेत. सोप्यांत समोरासमोर सारख्या मूर्ति

आहेत. मुख्य मूर्तीच्या बाहेरच्या बाजूस उजव्या व डाव्या हाताच्या भिंतीवर एक मांडी घालून व एक पाय खालीं सोडून बसलेल्या अशा बारा मूर्तींचा समुदाय आहे. याशिवाय समोरासमोर मांड्या घालून बसलेलीं अशीं पांच पांच चित्रें आहेत. ह्या मजल्यांत ही एक विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी स्पष्ट दिसून येणारी गोष्ट आहे कीं, जिकडे तिकडे आसनमांड्या घालून बसलेल्या मूर्ति खोदलेल्या आहेत. एका पंक्तींत ही मांड्या घालून बसलेली मंडळी पाहून मोठें कौतुक वाटतें. विद्यार्थ्यांस राहण्यासाठीं केलेल्या आसपासच्या लेण्यांत राहणाऱ्या विद्यार्थ्यांनीं या ठिकाणीं येऊन योगशास्त्राचा अभ्यास वस्तुपाठ–शिक्षणाच्या तत्वावर करावा असा या मूर्ति येथें पद्धतशीर रीतीनें खोदण्यांत हेतु असला पाहिजे, ही गोष्ट निःसंशय आहे.

तीन ताळांतील द्वारपाळ हात जोडून उभे आहेत, असें दाखविलें आहे. ज्या मूर्तीला रामचंद्र ह्मणतात ती मूर्ति ज्या ठिकाणीं आहे त्या गाभाऱ्यांत चोहींकडे उभ्या मूर्ति खोदलेल्या आहेत व प्रत्येकीच्या हातांत एकेक कमळाचें फूल असून फक्त एका मूर्तीच्या हातांत तरवार आहे. सर्व मूर्तींच्या मस्तकांवर मुगुट असून प्रत्येकीच्या गळ्यांत जानवें आहे. आणि गळ्यांत व हातांत भूषणें आहेत.

तीन ताळांत एके ठिकाणीं बौद्धांची जी एक अर्धवर्तुलाकार खूण आहे, तिचें दर्शक असें चित्र व नवग्रह एका चौकोनी जागेंत खोदलेले आहेत. नवग्रह ह्मणजे आदित्य, सोम, मंगळ, बुध, बृहस्पति, शुक्र, शनि, राहु आणि केतु. असा नवग्रहांचा जमाव वेरूळच्या लेण्यांत बऱ्याच ठिकाणीं आहे. विशेषतः तो बौद्धांच्या लेण्यांत ठिकठिकाणीं दिसून येतो. वेरूळच्या लेण्यांत स्वतंत्र खोदलेलें असें घोड्याचें चित्र फक्त एके ठिकाणीं आहे. तें तीन ताळांतील एका जिन्यांत आहे, व त्यावर एक मनुष्य बसलेला आहे. या चित्राचीं आकृति लहान आहे. स्वर्गलोकच्या जिन्यांत उजेड रहावा ह्मणून त्याला एक चांगली मोठी खिडकी पाडलेली आहे. स्वर्ग लोक फारच प्रशस्त व उत्तम स्थितींत आहे. त्या ठिकाणीं चोहोंकडे स्वच्छ प्रकाश पडत असल्यामुळें येथें उमें राहणारास आल्हाद वाटतो.

पूर्वीं कधीं कधीं लेण्यांतून असलेल्या खोल्यांत वाघ येऊन आपलें वस-तिस्थान करीत असे. परंतु अलीकडे ती भीति फारशी राहिली नाहीं. लेण्यांत आह्मी फिरत असतां एके ठिकाणीं तीन ताळांत आह्मांस कांहीं लेंड्या पडलेल्या दिसल्या. त्या वाघाच्या आहेत असें आमच्या वाटा-ड्यानें सांगितलें. आमच्या आडव्या तिडव्या प्रश्नास उत्तर देण्यास कंटा-ळून हा माहीतगार माणूस दोन तीन लेणीं मुकाट्यानें चालला होता व आह्मीं विचारल्याशिवाय बोलत नव्हता. आह्मीही त्याला बरोबर माहिती देतां येत नाहीं असें समजून त्याला विचारीत नव्हतों. पुढें लेंड्यांबद्दल प्रश्न केल्यावरून त्यानें आह्मांला भेडावण्यासाठीं वाघोबा पुढें केला असावा!

तिन्ही ताळ पाहणें झाल्यावर पुनः एकवार खालीं पहिल्या मजल्यासमोर उभें राहून वर दृष्टि फेंकावी ह्मणजे वर जी आह्मीं या लेण्याची प्रशंसा केली आहे ती यथायोग्य आहे, अशी खात्री पटेल; खांबावर खांब असे एकसा-रखे तीन मजले डोंगराच्या पोटांत कोरलेले पाहून व पुनः या तीन मज-ल्यांच्या डोक्यावर असलेला पर्वताचा भार अवलोकन करून पाहणारास खोदणाऱ्या शिल्पकाराच्या योजकतेविषयीं आणि कुशलतेविषयीं साश्चर्य अभिमान वाटल्याशिवाय राहत नाहीं, आणि शाबास त्याची असा त्यास धन्यवाद देत व पुनः पुनः मागें पहात पहात तो पुढें पाऊल टाकतो!

---

## रावणाची खाई.

तीन लोकांपासून थोड्याच अंतरावर रावणाची अगर रावणकी खाई या नांवाचें लेणें आहे. हें लेणें लहान आहे. परंतु त्याचें काम सुबक आहे. या लेण्याला हें नांव कसें मिळालें हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. कारण, खाई शब्दाला अन्वर्थक करण्यासारखें यांत काय असावें हा प्रश्न हें नांव ऐकिल्यावर साहजिकपणें उद्भवतो. परंतु त्याचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. ही रावणाची यज्ञ करण्याची जागा होती, असें सांगण्यांत येतें, व त्याला प्रत्यंतर ह्मणून जमिनीवरील एक खळगा दाखविण्यांत येतो, व हेंच

त्याचें होमकुंड होतें, असें वाटाडे सांगतात. या एका प्रकाराशिवाय लेण्यांतील खोदींव काम मागील लेण्यांतील खोदींव कामाप्रमाणेंच आहे.

रावणाच्या खाईंत शिरण्यापूर्वी जीं लेणीं लागलीं तीं सर्व बुद्धाचीं आहेत, हें त्यांच्या रचनेवरून, त्यांतील मूर्तीवरून व इतर खोदींव कामावरून पाहणारांच्या पूर्णपणें मनांत बिंबतें. येथून पुढें ब्राह्मणधर्मी लोकांचीं लेणीं लागतात, हें त्यांच्या पुढील वर्णनावरून वाचकांच्या सहज लक्ष्यांत येईल.

खाईत शिरल्याबरोबर प्रथमच उजव्या हाताला महिषासुरमर्दिनी भवानीचें चित्र आहे. जगदंबा देवी व्याघ्रारूढ असून तिच्या हातांत त्रिशूल व तरवार आहेत. मूर्तीच्या ठिकाणीं आविर्भाव चांगला दाखविला असून तिच्या वाहनानें महिषासुरावर ऊर्फ रेड्यावर झडप घातली आहे. सर्व देखावा एकंदरींत चांगला साधला आहे.

दुसऱ्या देवळींत शिव आणि पार्वती बसलेलीं असून त्यांचा पुत्र विघ्नहर्ता गजानन मागच्या बाजूस आहे. शिवाचें वाहन नंदी खालच्या बाजूस आहे. व त्याच्याच आसपास शिवाचे गण असून कोणी त्याचें शेंपूट ओढीत आहे, तर कोणी तंगडी ओढीत आहे, तर कोणी दुसऱ्या कांहीं खोड्या करीत आहेत, तथापि नंदीबैल त्यांस बिलकुल न जुमानतां स्वस्थ बसला आहे!

तिसऱ्या देवळींत भोलानाथ श्रीशंकराची मूर्ति असून एका नागानें त्याच्या कमरेला विळखा घातलेला आहे. येथेंच एक अष्टभुजा देवीचें चित्र आहे.

चवथ्या कोनाड्यांत शिवाचें वसतिस्थान जें कैलास तेथें शंकराची मूर्ति बसलेली आहे, व कैलास डोक्यावर घेऊन उपटण्याचा दीर्घ प्रयत्न रावण करीत आहे, असें दर्शविलें आहे. तसें करीत असतां त्याला फार प्रयास पडत असून आपलें सर्व बळ खर्चीं घालावें लागत आहे, हें ह्या देखाव्याकडे पाहिलें असतां सहज दिसून येईल. अशा प्रकारचें चित्र वेरूळच्या लेण्यांत ठिकठिकाणीं खोदलेलें आहे. रावण हा परम शिवभक्त होता. त्यानें मोठी तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न करून घेतलें.

शंकराची प्रसन्नता आहे असें जाणून त्यानें मोठा प्रळय मांडिला. देवांशीं युद्ध करून त्यांना कारागृहांत टाकिलें. एखाद्या सज्जन माणसाच्या सुस्वभावाचा त्याच्या पदरच्या एखाद्या नोकरानें फायदा घेऊन त्याच्या इतर आप्तवर्गास आणि स्नेह्यांस छळण्याची व फसविण्याची सुरवात करावी, त्याप्रमाणें रावणाचें झालें होतें. होतां होतां तो इतका शिरजोर बनला कीं, शेवटीं आपल्या मालकाचें घर पाळ्यामुळ्यांसुद्धां उपटण्याचा त्यानें बेत केला. शिवाची आराधना करण्यासाठीं विनाकारण कैलासाचा हेलपाटा पडतो, इतकी दगदग सोसण्याचें काय प्रयोजन आहे, असें त्याच्या डोक्यानें एकदां घेतलें आणि राजश्रींनीं कैलासच उचलण्यास डोकें दिलें ! त्या प्रयत्नांत बिचाऱ्यास कैलासाखालींच दबून रहावें लागलें ! रावणासारखीं माणसें जगांत शेंकडों आहेत. शेवटीं त्यांचा परिणाम वाईट होतो, एवढा धडा आपण त्यांजपासून शिकण्यासारखा आहे*. याच कोनाड्यांत वरच्या बाजूस आणखी एक चतुर्भुज मूर्ति असून ती दोन हातांनीं एका स्त्रीमूर्तीस कवटाळीत आहे असें दाखविलें आहे. याच्या पुढील कोनाड्यांत वीरभद्राची त्याच्या सर्व आयुधांनीं युक्त अशी मूर्ति आहे.

आतां आपण डाव्या हाताकडे वळूं. पार्वती आणि शंकर बसले आहेत व खालच्या बाजूस शिवगण निरनिराळीं वाद्यें वाजवीत आहेत. उजव्या बाजूस एक स्त्रीची मूर्ति असून तिच्या मस्तकावर दुसऱ्या एका स्त्रीनें छत्री धरिली आहे. अशा प्रकारचें चित्र सर्व लेण्यांत एवढेंच आहे. चित्रें खोदणारांनीं पौराणिक कथांचीं द्योतक अशीं चित्रें खोदिलीं हें तर खरेंच, परंतु तसें करितांना तत्कालीन स्थितीचें चित्र त्यांच्या नजरेसमोर नसेल असें संभवत नाहीं. ह्मणून इतक्या प्राचीन काळीं सुद्धां जर स्त्रिया

---

* ग्रीक लोकांच्या पुराणांतरीं या रावणाच्या कथेशीं साम्य असणारी एक गोष्ट आहे. ज़ुपिटर ही ग्रीक लोकांची मोठी देवता. ब्रिआरिस हा त्याचा मोठा भक्त होता. रावणाप्रमाणेंच त्याला पुष्कळ तोंडें व हात होते. रावणाप्रमाणेंच ब्रिआरिसनेंही देवांना त्राहि त्राहि करून सोडलें होतें, व ते इजिप्त देशांत पळून गेले. शेवटीं ब्रिआरिसचें पारिपत्य त्यास एटना पर्वताखालीं ढकलून देऊन करण्यांत आलें.

छत्र्या वापरतीत होत्या, तर हल्लीं त्यांस वापरण्यास प्रत्यवाय कां असावा? अथवा कोणी वापरूं लागल्यास त्यांस इतरांनीं कां हसावें, हें समजत नाहीं!

याच्यापुढें उत्तरेच्या भिंतीवर आणि गाभाऱ्याच्या उजव्या बाजूला नवरात्रीचें चित्र आहे. तेथें सात स्त्रियांच्या मूर्ति आहेत. त्या सात मातृका असून मुख्यस्थानीं गणपतीची मूर्ति आहे; जवळच भैरव आहे. याला लागूनच सुदामदेवासारख्या रोडक्या नुसता अस्थिपंजर राहिलेल्या अशा तीन मूर्ति आहेत. कवडी कवडी करून धनसंचय करणाऱ्या कृपणाच्या त्या मूर्ति आहेत, असें सांगण्यांत येतें.

यानंतर एक चतुर्भुज मूर्ति एका स्त्रीस जवळ घेऊं पाहत आहे, असें दाखविलें आहे. पुढील देवळींतील सबंध चित्रावर कोणीं घाव मारून तें फोडिलें आहे, किंवा आपोआप धलपा पडलेला आहे हें सांगतां येत नाहीं. या ठिकाणीं शंकर, गंगा आणि गौरी यांसह बसले आहेत, असें चित्र होतें ह्मणतात. पुढील देवळींत विष्णूचा वराह अवतार दाखविला आहे. हा वराह पृथ्वी उचलून धरीत आहे, असें दाखविलें आहे. पुढें लक्ष्मीची मूर्ति असून तिजवर दोन्ही बाजूंनीं हत्ती आपल्या सोंडांनीं पाणी टाकीत आहेत. या लेण्याच्या मध्यभागीं कशाची मूर्ति असावी याचें पक्कें अनुमान काढितां येत नाहीं. कारण ती मूर्ति फुटलेली आहे.

---

## दशावतार.

खाईत फार वेळ घालविणें इष्ट नाहीं. एखादी लागीर बिगिर व्हावयाची! याकरितां आपण आतां बाहेर पडून दुसऱ्या लेण्याकडे वळूं. उत्तरेच्या बाजूला थोड्या अंतरावर बरेंच उंच चढून जावें लागतें. तेथें जें लेणें लागतें त्याच्या तळमजल्याची सपाटी रावणाच्या खाईच्या उंचीच्या सपाटीबरोबर आहे. विष्णूनें आपल्या भक्तांच्या उद्धारासाठीं व पाप्यांचा संहार करण्याकरितां, 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' या भगवद्वाक्याप्रमाणें जे निरनिराळे अवतार घेतले, त्यांपैकीं कांहीं या लेण्यांत खोदले आहेत,

ह्मणून यास दशावतार ह्मणतात. परंतु लेण्याच्या मुख्यस्थानीं पाहिलें, तर शिवलिंग आहे.

हें लेणें दुमजली आहे. समोर मध्यभागीं जागा केल्यासारखी दिसते, ती नंदीची असावी. पहिल्या मजल्यांत आंत शिरल्यावर डाव्या हातास थोडें खोदलेलें आहे. त्यांत महादेवाचें लिंग असून बाजूसच त्रिमुखी मूर्ति आहे. उजव्या हातास गणपति आहे. डाव्या हाताला सहा खोल्या आहेत. दोन्ही कोंपऱ्यांत दोन दोन खोल्या आहेत. पहिल्या मजल्यांत वर दिलेल्या मूर्तींशिवाय ज्यास्त खोदींव काम नाहीं.

डाव्या हातानें वर जाण्यास जिना आहे. त्यानें वर गेलें ह्मणजे आपण एका भव्य आणि टोलेजंग दिवाणखान्यांत उतरलों आहों असें वाटतें. या मजल्याला मोठमोठे स्तंभ आहेत. या दिवाणखान्याची लांबी सुमारें शंभर फूट आहे व रुंदीही जवळ जवळ तितकीच आहे, व उंची बारा फूट आहे. पुढील बाजू सबंध मोकळी असल्यामुळें सर्व मजल्याभर स्वच्छ प्रकाश पडतो. प्रकाश हा मनुष्याच्या मनास आल्हाद देणारा, अंतःकरणास सुप्रसन्न करणारा व चित्तवृत्तीस स्थैर्य आणणारा आहे. मग तो सूर्यप्रकाश असो वा ज्ञानप्रकाश असो. दोहोंची जात एक व गुणधर्मही परिणामीं एकच. साधारणतः असें आढळून येईल कीं, ज्यांना सूर्याचे किरण सहन होत नाहींत, अथवा त्यांयोगानें ज्यांचीं मनें प्रफुल्लित होत नाहींत, ते दिवाभीत होत. अशांना ज्ञानसूर्याच्या वातावरणांत यथेच्छ संचार करण्याचें कधींही धैर्य होत नाहीं. त्यांच्या कल्पना आकुंचित, त्यांचे विचार पोरकट व त्यांचें आचरण स्वार्थपरायण असावयाचें. ज्यांना प्रकाशाचें महत्व कळलें आहे, ते तो जिकडून येईल तिकडून येण्यास त्याचा मार्ग खुला करून ठेवितात व तज्जन्य फायदा करून घेतात. लेण्यांच्या रचनेवरून त्यांच्या उत्पादकांना प्रकाशाचें महत्व चांगलें कळत होतें. तो जितका ज्यास्त प्राप्त होईल तितका त्यांस हवा होता, हें उघड दिसतें. या गोष्टीपासून आपणांस कांहीं धडा शिकतां यावयाचा नाहीं काय?

अस्तु. दिवाणखान्याचें अवलोकन केल्याबरोबर मनांत जे विचार उद्भवले त्यांतच तल्लीन न होतां, त्यांतील आजुबाजूंच्या खोदलेल्या मूर्तींकडे वळूं. डाव्या बाजूला प्रथम वीरभद्राची मूर्ति लागते. पुढें शिवाचें दर्शन होतें. शिव आणि पार्वती बसलीं असून नंदी व शिवगण भोंवतीं आहेत. पुढच्या देवळींत पुनः शिवपार्वतीच्याच मूर्ति आहेत. पण तीं बसलेलीं नसून एकमेकांच्या हातांत हात घालून उभीं आहेत. शंकरपार्वतीचीं जितकीं चित्रें लेण्यांत आढळतात, त्या सर्वांत असें दिसून येतें कीं, जेव्हां शंकराजवळ त्याची अर्धांगी पार्वती असते, तेव्हां त्याला दोनच हात असतात. शेजारच्या कोनाड्यांत शिवपार्वती कैलासांत बसलेलीं खोदलीं असून रावण कैलास हालवीत आहे. यानंतर पुनः शिवपार्वतीच्याच मूर्ति असून पांच मूर्ति त्यांना नमस्कार करीत आहेत, असें दाखविलें आहे. ह्या पांच मूर्ति ह्मणजे पांच पांडव होत, असें सांगण्यांत येतें. या देवळीवरून दृष्टि उचलून शेजारच्या देवळीकडे फिरवावी, तों एक भली मोठी शंकरसूत गणपतीची मूर्ति दृष्टीस पडते. याच्या पुढें एक मूर्ति आहे, तिला कोणी सीता ह्मणतात व कोणी लक्ष्मी ह्मणतात. तिच्या डाव्या हातांत सीताफळ आहे, तें सुरेख हुबेहुब खोदलेलें आहे. उजव्या हातांत कमळ आहे आणि मस्तकावर दोन हत्ती दोन बाजूंनीं आपल्या सोंडांतून जलसिंचन करीत आहेत, असें दाखविलें आहे. सीताफळ हें नांव सीतेपासून त्या फळास प्राप्त झालें, व तें फळ ह्या मूर्तीच्या हातांत आहे, ह्मणून तीस सीता ह्मणावयाचें असल्यास खुशाल ह्मणावें. परंतु लक्ष्मीचीं इतर ठिकाणीं लेण्यामध्यें जीं चित्रें आहेत, त्यांशीं या मूर्तीचें साम्य विशेष जुळतें, हें पाहणाराच्या तेव्हांच लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. शिवाय या चित्रास सीता न ह्मणण्याचें आणखी एक कारण असें आहे कीं, या लेण्यांत रामावतारांतील चित्रें कोठेंच आढळत नाहींत. तेव्हां फक्त सीतेची मूर्ति खोदण्यांत कांहीं योजकता दिसत नाहीं. पुढें कार्तिकस्वामीची मूर्ति आहे.

शिवदर्शन घेण्यांत आपण इतका वेळ घालविला. आतां आपण विष्णूच्या अवतारांकडे वळूं. प्रथम भक्तकाजकैवारी जो श्रीहरी, त्यानें

आपला निस्सीम भक्त प्रल्हाद याचा शब्द खरा करण्याकरितां व त्याचा छळ करणाऱ्या दुष्ट पित्यास शासन करण्यासाठीं, स्तंभांतून प्रगट होऊन नरसिंह अवतार घेतल्याचें चित्र आहे. यापुढें पुनः त्रिपुर दैत्याचा वध करून शिव आपल्या रथामध्यें पहुडले आहेत, असा देखावा आहे. नंतर शंखचक्रगदापद्मयुक्त विष्णुमूर्ति, गरुडावर आरूढ झालेली कृष्णमूर्ति, परमात्मा शेषशाई भगवानाच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेली ब्रह्मदेवाची मूर्ति, वराह अवतार, वामन अवतार, नरसिंहावतार व हिरण्यकश्यपूचा वध याप्रमाणें मूर्ति अवलोकनांत येतात. या लेण्यांतील मूर्ति इतक्या स्पष्ट व उमटून खोदलेल्या आहेत कीं, जणों काय पुतळे तयार करून तेच चिकटवून दिले आहेत, असा भास होतो.

## कैलास.

दशावतारांतून उत्तरेच्या बाजूस थोड्या अंतरावर खालीं उतरून आपण गेलों, म्हणजे कैलासाच्या महाद्वारापुढें येतों. कैलासापुढें सपाटीची मोकळी जागा पुष्कळ आहे. वेरूळचीं लेणीं इतर ठिकाणच्या लेण्यांहून विस्तृत आहेत, अशी त्यांची ख्याति आहे. परंतु त्यांची विशेष प्रसिद्धि होण्यास कैलास हें लेणें मुख्यतः कारणीभूत आहे. कैलासाशिवाय जीं लेणीं आहेत तीं सर्व डोंगराच्या पोटांत आहेत. परंतु कैलास हें देऊळ असून तें डोंगराच्या पोटांतून खोदून काढिलें आहे. येथवर वर्णन केलेल्या लेण्यांचा दगड किंचित् पांढुरका आहे. पण कैलासाचा दगड अगदीं काळाकुळकुळीत आहे. हा दगडाचा रंगही त्याचा भव्यपणा वाढविण्यास साधनीभूत झालेला आहे. कैलासाला निरनिराळ्या रंगांनीं विभूषित केलें होतें, असें ठिकठिकाणीं दिसणाऱ्या रंगांवरून दिसतें. रंग फक्त बाहेरच्या बाजूस दिलेला असल्यामुळें पावसानें त्याचा धुवा उडवून दिला आहे, हें उघड दिसतें. हें रंग देण्याचें काम देवगिरीच्या राजांनीं केलें होतें असें म्हणतात.

कैलासापुढें उभें राहिल्यावर दृष्टि फांकल्यासारखी होते आणि कल्पनाशक्ति आपलें ठिकाण सोडून निदान त्या वेळेपुरती तरी पार नाहींशी होते.

एखादा माणूस उचकल्यावर त्याला जसें भान राहत नाहीं, तद्वत् कांहीं अंशानें आपली स्थिति होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जिकडे पहावें तिकडे अफाट व भव्य देखावा नजरेस येतो. पश्चिमेस पहा, पूर्वेस पहा, अथवा उत्तरेस किंवा दक्षिणेस पहा, तेथील भव्य देखावा मोठ्या गांभीर्यानें आपलें स्वागत करीत आहे, असें वाटतें, व कोणत्या बाजूकडून होणाऱ्या स्वागताचा प्रथम आदरपूर्वक स्वीकार करावा, हें कोडें पाहुण्याच्या मनांत उभें राहतें. ज्यानें आपलें सर्व आयुष्य गांवढळ लोकांत चावडींत बसून तोंडपाटीलकी करण्यांत घालविलें, व गांवगुंडपणांत नांव मिळविलें, पण ज्याला नागरीकपणाचा गंधही लागला नाहीं, अशा माणसास एकदम एखाद्या राजसभेंत नेऊन उभें केलें असतां, तेथील अमीर, उमराव, सरदार, दरकदार, कारभारी, मानकरी व भालदार, चोपदार व इतर संभावित सभाजन यांचा समुदाय पाहून एकाचढी एक थोर असे लोक येथें जमले आहेत, यांपैकीं प्रथम कोणास लवून रामराम करावा अथवा नमस्कार करावा, या विचारानें जसें त्याचें मन गोंधळून जातें, तसेंच येथेंही पाहणाराचें मन गोंधळून जातें. चोहोंकडे प्रेक्षणीय पदार्थ, ह्मणजे मूर्ति आणि खोदींव काम, पाहण्यास आरंभ करावा तरी कोठून असें होऊन जातें. आश्चर्य आणि आनंद या दोन वृत्ति अंतःकरणामध्यें विशेष प्रबळ होतात, पण त्यांबरोबर मनांत एक प्रकारची भीतिही उत्पन्न होते. उचंबळलेल्या मनोवृत्ति शांत होण्यास बराच कालावधि लागतो. तोंपर्यंत भोंवतालच्या मूर्तींकडे अगर देखाव्याकडे लक्ष्यपूर्वक पाहण्यास चित्त एके ठिकाणीं स्थिरावत नाहीं. मुंबईसारख्या शहरांतील टोलेजंग इमारती अथवा मोठमोठ्या संस्थानांतील राजवाडे अथवा राजांचीं विलासमंदिरें पाहतांना जी मनाची स्थिति होते तीहून या ठिकाणचा देखावा पाहून त्याची मनोवृत्ति अगदीं भिन्न होते. जगास थक्क करून सोडणाऱ्या या लेण्यास जन्म देणाऱ्या पर्वताच्या भोंवतालची शांतता व आल्हादकारक वनश्री यांचें चित्र एकसमयावच्छेदेंकरून पहाणाराच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभें राहिल्यामुळें तो अगदीं वेडावून जातो. व एकेक पाऊल मोठ्या जुलमानें टाकावें लागतें. आणि असें करीत असतां हीं

लेणीं निर्माण करणाऱ्या कल्पक व बलाढ्य लोकांविषयींची पूज्यबुद्धि पदोपदीं वाढत जाते; त्यांचेच वंशज आपण हल्लींचे लोक सर्वस्वी हीनावस्थेस पोंचलों, आपली कल्पकता नाहींशी झाली, आपलें साहस नष्ट झालें व आपण उद्योगहीन बनून सर्वस्वी परावलंबी बनलों आहों, इत्यादि विचार मनांत एका मागूनएक येतात. अशा विचारांनीं उडवून दिलेली मनाची खळबळ थोडी शांत झाल्यावर ज्या आमच्या पूर्वजांनीं आपल्या शिल्पशास्त्र-नैपुण्याचीं हीं चिरस्थायी स्मारकें करून ठेविलीं आहेत, त्यांचा धन्यवाद गाण्याची सहज प्रवृत्ति झाल्याशिवाय व सद्यःकालीन हीन स्थितीबद्दल खेद वाटल्याशिवाय राहत नाहीं.

जें कांहीं पहावयाचें तें लक्षपूर्वक व कोणत्या उद्देशानें अमुक मूर्ति खोदिली असेल, व प्रत्येक मूर्ति कोणाची आहे, याबद्दल चौकशी करून पहावयाचें असा निश्चय करून पहावयास जाणारांस, आह्मी ज्या प्रसंगाचें वर्णन करीत आहों, अशा वेळीं आपण काय पहावें व काय सोडावें असें साहजि-कपणें होतें. कैलासांत शिरूंपर्यंत आह्मी सर्व मंडळी आपापलीं नोटबुकें सरसावून झपाट्यानें टिपणें करून घेत होतों; पण येथें आल्यावर कित्ये-कांच्या स्मरणवह्या आपोआप खिशांत जाऊन पडल्या, कित्येकांच्या पेन्सिली लेहावयाचें सोडून देऊन दांतांशीं झगडावयास लागल्या, व आह्मांपैकीं कांहींनीं आपल्या पेन्सिली आणि स्मरणवह्या या दोहींसही न कळत कायमची रजा दिली!

कैलासाचें साग्र वर्णन करूं ह्मटल्यास तें फार विस्तृत होणार आहे, व तसें करण्याच्या प्रयत्नांत यश संपादन करण्याची जरी हांव धरिली, तरी ती सफल होण्याची फारशी आशा नाहीं. यासाठीं या अचाट आणि अवाढव्य कृतीचें निदान पुसट चित्र तरी वाचकांपुढें आटपसर रीतीनें रेखाटण्याचा प्रयत्न करण्याचें योजिलें आहे. कारण, नुसत्या खोदलेल्या मूर्तींचें वर्णन व त्यांचा इतिहास द्यावयाचें जरी मनांत आणिलें तरी कदाचित् कंटाळवाणा होण्याइतका त्याचा विस्तार होण्याची भीति आहे. जें कांहीं वर्णन पुढें देण्यांत येईल, तें वाचून वाचकांच्या मनांत हीं लेणीं पाहण्याची

बळकट इच्छा उत्पन्न झाली, ह्मणजे आमचा कार्यभाग बऱ्याच अंशीं सिद्धीस गेला, असें आह्मी मानूं.

पश्चिमाभिमुखी प्रवेश मार्गांतून आंत गेलें ह्मणजे समोर मुख्य कैलास हें सुंदर, मनोरम आणि भव्य मंदिर दृष्टीस पडतें. हें डोंगरांतून पोखरून काढलेलें आहे. त्याच्या सभोंवार चारी बाजूंस उघडी जागा असून तिच्या पलीकडे ओवऱ्या आहेत. कैलास या देवालयाच्या वरील भागाचा आकार तंजावर येथील प्रसिद्ध देवालयाप्रमाणें आहे. किंवा लोकांच्या पाहण्यांतील विशेष परिचयाचें उदाहरण द्यावयाचें ह्मणजे बाजारांत देवळाच्या वरील भागाच्या आकाराचीं साखरेचीं चित्रें मिळतात त्यांच्या-प्रमाणें त्याचा आकार आहे. मध्यभागीं असलेलं मुख्य देऊळ शंभर फूट उंच आहे. त्याच्या भोंवतीं त्याच्याच आकाराचीं पांच लहान देवळें आहेत. समोर नंदीचें देऊळ व त्याच्यापुढें नगारखान्याची जागा हीं आहेत.

एका जंगी चिरेबंदी फरशी केलेल्या चौकापेक्षांही उत्तम अशा चौकाचे मध्यभागीं कणखर खडकांतून खोदून काढलेलें, ज्यांत न्यूनता दाखविण्यास कोठेंही जागा नाहीं असें सर्वांगसुंदर व भोंवतालच्या विस्तृत खुल्या जागेनें ज्याच्या विशाळपणांत दुप्पट भर पडली आहे, असें हें प्रचंड देऊळ दृष्टीस पडल्यावर किती आश्चर्य वाटणार आहे, याची कल्पनाच केली पाहिजे. देवळाभोंवतालची मोकळी जागा सुमारें अडीचशें फूट लांब आणि दीडशें फूट रुंद आहे. मुख्य देवळाकडे पाहिलें तरी त्याची लांबी १४५ फूट असून रुंदी बासष्ट फूट आहे. उंची वर दिली आहेच. त्यामुळें त्याला त्याच्या आंगचाच मोठेपणा प्राप्त झाला आहे. देवालयाचीं रेखांकित द्वारें, खिडक्या आणि देवळांत वर चढून जावयाचे जिने, हीं सर्व प्रमाणशुद्ध आहेत, आंतल्या आंगास मोठमोठीं सुंदर दालनें कोरिलीं असून त्यांतील जमीन गुळगुळीत दगडाची बनविलेली आहे. ह्या दालनांस भले जंगी खांब आहेत व त्यांवर फार सुंदर नकशी काम केलेलें आहे. त्याचे पलीकडे मोकळी

जागा सोडून तीन बाजूंस सुंदर मूर्ति ज्यांत खोदलेल्या आहेत व आपल्या बलाढ्य खांबांनीं शिरावर असलेला सर्व पर्वताचा भार लीलेनें ज्यांनीं सहज झेलून धरला आहे अशा ओवऱ्या आहेत. या ओवऱ्यांच्या प्रत्येक खणांत खोदलेल्या पुराणांतील कथानकांचें स्मरण करून देणाऱ्या मोठमोठ्या मूर्ति, ओवऱ्यांची रुंदी व उंची व त्यांची एकंदर चारशेंवीस फुटांची लांबी या सर्व गोष्टी प्रथमदर्शनीं वाटलेल्या आश्चर्यांत किती तरी पटीनें भर घालितात !

बाहेरून पाहिलें असतां देवळाचा खालचा भाग दृष्टिगोचर होत नाहीं. कारण पुढें भिंत आहे. या भिंतींत मध्यभागीं आंत जाण्यास प्रशस्त असें महाद्वार आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस दोन स्त्रिया द्वारपालाचें काम करीत आहेत. येथवर आपल्या असें पाहण्यांत आलें आहे कीं, द्वारपाळ ह्मणजे पुरुषाच्या मूर्ति खोदलेल्या असावयाच्या. या स्त्रीद्वारपाळांच्या डोक्या-वर छत्रीसारखें कांहीं आच्छादन आहे. मूर्तींच्या डोक्यावर असलेलें अशा प्रकारचें आच्छादन प्रथम वर्णन केलेल्या बुद्धांच्या लेण्यांतून फार वेळा दृष्टीस पडतें. तें बौद्धांच्या विशिष्ट चिन्हांपैकीं एक प्रमुख आहे, असें ह्मणतात. महाद्वारावर नगारखान्याची जागा आहे. ह्या नगारखान्यांतून पुढें जाण्यास मार्ग आहे. परंतु तो मोडकळीस आल्यासारखा दिसतो. त्याच्या शरीरांत भेगा पडलेल्या आहेत, तेव्हां तो कोसळेल कीं काय याची भीति वाटते. दरवाजांतून आंत गेल्यावर "संमुखोऽर्थ लाभाय" अशी अर्थप्रद होणारी सर्वसंपत्तीचें आगर अशी धनदात्री लक्ष्मीची मूर्ति दृष्टीस पडते.

आपण येथें थोडा वेळ थांबूं, व लक्ष्मीची सुंदर मूर्ति चांगली लक्षपूर्वक बघूं. बौद्धांच्या लेण्यांतून आसन घालून बसलेल्या ज्या अनेक मूर्ति आपणांस पाहावयास मिळतात, त्यांप्रमाणेंच ही लक्ष्मी मांडी घालून बसलेली आहे. खालीं पाण्यांत उगवणाऱ्या कमल पुष्पांवर तिनें आसन घातलें आहे. दोन्ही बाजूंस एकेक हत्ती असून ते आपल्या सोंडांत धरलेल्या पात्रांतून लक्ष्मीच्या मस्तकावर उदक सिंचन करीत आहेत व

खालून दोन हत्ती भांडीं पाण्यानें भरून त्यांस पाणी पुरवीत आहेत. लक्ष्मीच्या मस्तकावर छत्र आहे. दोन्ही बाजूंस एकेक मूर्ति उभी आहे. लक्ष्मीची मूर्ति नग्न असून तिच्या आंगावर कानांतील भूषणांशिवाय इतर कोणतींही भूषणें नसल्यामुळें व इतर गोष्टींत बुद्धांच्या मूर्तींशीं तिचें साद्दश्य मिळत असल्यामुळें या मूर्तीचा संबंध बुद्धाच्या मूर्तींशीं कांहीं तरी असला पाहिजे अशी कल्पना धांवते. सर्व विश्वाची जननी या दृष्टीनें जर या मूर्तीचें महत्व दाखविण्याचा हेतु असेल, तर अशा प्रकारच्या देवता बॅबिलोनिअन, इजिप्शिअन, ग्रीक आणि रोमन या लोकांमध्येंही प्राचीन काळीं होत्या, असा त्या त्या लोकांच्या इतिहासांत दाखला सांपडतो.

लक्ष्मीच्या पुढून दोन्ही बाजूंस देवळाभोंवतालच्या उघड्या पटांगणांत जातां येतें. लक्ष्मीपुढें उभें राहिलें असतां डाव्या व उजव्या बाजूस नजर फेंकली म्हणजे पटांगणांत समोरासमोर दोन उभे असलेले हत्ती दिसतात. उजव्या हातचा हत्ती हल्लीं फुटलेला आहे. कांहीं वर्षांपूर्वीं दोन्ही हत्ती मातींत गढून गेले होते. नंदीच्या देवळापुढें एक लहानसा पूल आहे. त्या पुलाच्या पायथ्याच्या दोन्ही बाजूंनीं वर देवळांत जाण्यास चांगल्या पायऱ्या आहेत. त्या चढून वर गेलें म्हणजे आपण देवळापुढील भागांत जातों. येथें जाऊन उभें राहिल्याबरोबर देवळाच्या सौंदर्याची व त्यावर अत्यंत मेहनतीनें काळजीपूर्वक खोदलेल्या अप्रतिम खोदींव कामाची मूर्तिमंत प्रतिमा पुढें उभी राहते, व माणूस आश्चर्यचकित होऊन थोडा वेळ तरी गुंग झाल्या शिवाय राहत नाहीं. निरनिराळ्या मनुष्यांच्या मूर्ति अथवा देवादिकांच्या मूर्ति, जनावरांच्या मूर्ति, खांबांवरील बारीक नकशी, मूर्तींच्या आंगावरील भूषणें इत्यादिकांच्या सौंदर्याची व मोहकपणाची अगदीं बरोबर कल्पना प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय येणें कठीण आहे. अशा प्रकारचें कौशल्याचें काम शंभर फूट उंचीच्या देवळाचें आहे. तें देवळाचे आंत व बाहेर असून सर्वांगसुंदर असें आहे. देवळाच्या नमुन्याचींच त्यासभोंवतीं पांच लहान देवळें आहेत, व त्यांजवरही बारीक खोदींव काम आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे एकंदरींत कारागिरांनीं ह्या

कामीं किती जीवांपाड मेहनत घेतली असेल, याची कल्पना सहज करितां येण्यासारखी आहे.

हिंदु लोकांनीं जरी अनेक देवता मानिल्या असल्या, तरी त्यांजमध्यें प्राधान्य फार थोड्यांस आहे. आणि जरी शेंकडों देवता त्यांना मान्य असल्या, तरी त्या एकाच चिदशक्तीचीं रूपांतरें होत, असा त्यांचा ठाम सिद्धांत आहे. सृष्टिउत्पन्नकर्त्या परमेश्वराची ओळख मनुष्यमात्रास जगांतील उलाढालींवरून मुख्यतः तीन प्रकारांनीं पटते. जगांतील घडामोडीवरून प्रत्येक प्राण्यास जन्म आणि मृत्यु हा न्याय एकसारखा लागू आहे असें प्रत्येक जणाच्या दृष्टीस पडतें. मनुष्यप्राणी जन्मास येतो, त्याचें पालन पोषण होतें, व त्याचा अंत होतो. हीं तिन्ही कार्यें घडविणारा ह्मणजे सृष्टिस्थितिलयकर्ता परमेश्वर एकच आहे अशी आमची अत्यंत प्राचीन काळापासून दृढ समजूत आहे. परंतु उत्पन्न करण्याचें कार्य घडविणारा तो ब्रह्मा, पालन करणारा तो विष्णु व लय अथवा संहार करणारा तो महेश अथवा शंकर अशीं त्यास निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. ब्रह्मदेवाचे उपासक कोठें नाहींत, अथवा ब्रह्मदेवाला पुष्कर या ठिकाणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं देऊळ नाहीं. विष्णूचे आणि शिवाचेच उपासक सर्वत्र फार सांपडतात. त्यांतले त्यांत शिवाला फार प्राचीन काळापासून प्राधान्य दिलेलें आहे. शंकरानें पार्वतीला मांडीवर घेतलें आहे, डोक्यावर भागीरथीला बसविलें आहे, हातांत नाग धरिला आहे वगैरे जीं चित्रें आपल्या पाहण्यांत येतात तशा प्रकारच्या मूर्ति कोणत्याही शिवालयांत नाहींत. शिवालय ह्मणजे शिवलिंगाची स्थापना जेथें झाली आहे असें देवालय. लिंगपूजा ही तात्विक दृष्ट्या फार उच्च तत्वावर बसविलेली आहे व तिच्यांत विशेष गूढार्थ आहे. वर वर पाहणाऱ्यांस त्यांतील मर्म समजत नाहीं. जितकीं ह्मणून प्राचीन क्षेत्रें आहेत, तेथें तेथें शिवलिंगें आहेत. यावरून शिवोपासना फार प्राचीन आहे हें उघड आहे. शिवाची उपासना आद्य शंकराचार्यांनंतर विशेष फैलावली असावी, असें मानण्यास जरी प्रमाणें आहेत, तरी ज्या कालीं हीं लेणीं कोरिलीं गेलीं, त्या कालींही

शिवोपासनेस प्राधान्य असलें पाहिजे, ही गोष्ट निर्विवाद आहे. कैलास हें महादेवाचें स्वर्गातील वसतिस्थान होय. त्याच्या विषयीं अत्युच्च कल्पना डोळ्यांपुढें ठेवून कल्पकानें ही कारागिरी उठवून दिली आहे. ती वस्तुस्थितीशीं कितपत जुळते, याचा अनुभव कोणा थिआसोफिस्टास अथवा योगशास्त्रज्ञास असल्यास त्याचा अनुग्रह त्यानें जगावर करावा !

कैलासाचे आंत शिरल्यावर मध्यभागीं शिवलिंग दृष्टीस पडतें. तें सुंदर गाभाऱ्यांत आहे. शिवलिंग ह्मणजे देवालयांतील गाभाऱ्यांत खोल असावयाचें असें आपल्या नेहमींच्या पाहण्यांत आहे. पण येथें तसा प्रकार नाहीं. तें देवळाच्या इतर पृष्ठभागाबरोबरीच्याच उंचीवर आहे. लेण्यांत जेथें जेथें शिवलिंगें आहेत तेथें तेथें तसेंच आहे. या शिवलिंगाची बारा ज्योतिर्लिंगांमध्यें गणना नाहीं. वास्तविक हें लिंग स्वयंभू आहे असें ह्मटलें पाहिजे. या गाभाऱ्यापुढें चांगला प्रशस्त सभामंडप आहे. त्याची लांबी सरासरी पंचेचाळीस हात व रुंदी सुमारें चाळीस हात आहे. सभामंडपाचें छत गुळगुळीत आहे. खालील जमिनीपासून त्याची उंची सोळा सतरा फूट आहे. त्याला सोळा खांब असून सभामंडपाच्या भोंवतीं त्याला लागूनच जी पडवी काढली आहे तिला बावीस खांब आहेत. खांब सारख्या अंतरावर आहेत, परंतु मध्यभागच्या दोन खांबांमध्यें जास्त अंतर सोडलेलें आहे. सभामंडपांत शिरण्यास पांच दारें आहेत. एक पश्चिमाभिमुखी, एक उत्तराभिमुखी, एक दक्षिणेकडे व दोन गाभाऱ्याला लागून त्याच्या दोहोंबाजूस पूर्वाभिमुखी. पश्चिमाभिमुखी द्वार मुख्य होय. त्याची व दक्षिणोत्तर दारांची उंची सारखी आहे. दारांची उंची बारा फूट आहे. चोहों बाजूंनीं दारें असल्यामुळें आंत स्वच्छ उजेड पडतो. गाभाऱ्याच्या दाराच्या दोन्ही बाजूंस दोन द्वारपाळांच्या मूर्ति असून त्या स्त्रियांच्या आहेत. सभामंडपाची खालची जमीन अगदीं गुळगुळीत व चकचकीत आहे. सभामंडपाचे खांबही तसेच गुळगुळीत असून त्यांजवर सुंदर नकशी खोदिली असल्यामुळें विशेष शोभा दिसते. ज्या वेळीं देवळाला रंग देण्याचें काम झालें, त्यावेळीं या छतालाही गिलावा करून त्यांजवर रंग

दिला असावा. परंतु त्याची पूर्वींची शोभा कायम राहिली नाहीं. पूर्वाभिमुखी दरवाजांतून मागें जाऊन देवळाला प्रदक्षिणा घालण्याची सोय आहे. प्रदक्षिणा घालतांनाच वर सांगितलेलीं पांच देवळें लागतात. हा भाग बराच उंचीवर असल्यामुळें येथें प्रदक्षिणा घालतांना आपण एका रम्य गच्चीवर हिंडत आहों, असें वाटतें.

येथें रमत रमत, सावकाश देवळाला प्रदक्षिणा घालीत व देवळाच्या कळसाच्या नकशी कामाचें कौतुक करीत आपण पुनः दुसऱ्या दरवाजानें सभामंडपांत येतों. व कांहीं अंशीं स्थिरमनानें पाहण्यास आरंभ केल्यावर सभामंडपाच्या मध्यभागीं छताला लक्ष्मीनारायणाची खोदलेली मूर्ति दृष्टीस पडते. सभामंडपाच्या कोणत्याही बाजूनें त्या लक्ष्मीनारायणाच्या मूर्तीकडे पाहिलें, तरी ती मूर्ति आपणांकडे पहात आहे, असें दिसतें. त्यावरून हा एक अद्भुत चमत्कार आहे, असें तेथील ब्राह्मण आणि गुरव ह्मणतात. कोणतेंही चित्र उत्तम वठलें आहे किंवा नाहीं, हें ठरविण्याचीं जीं प्रमाणें आहेत, त्यांत चित्राकडे कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी त्याची दृष्टि आपल्याकडेच आहे असें पाहणाऱ्यास वाटणें हें एक होय. हा चित्रकलेचा एक नियम आहे; तो चित्र खोदणाऱ्या कारागिरास पूर्णपणें अवगत होता, परंतु दाखविणाऱ्या वाटाड्यास त्याविषयीं पूर्ण अज्ञान असतें, याशिवाय या अद्भुत चमत्काराच्या मुळाशीं दुसरें कांहीं नाहीं.

कोणतेंही ठिकाण पहावयास गेलें असतां त्या ठिकाणीं पेन्सिलीनें अथवा दगडानें आपलें नांव खोदून ठेवावें, अशी वाईट खोड फार लोकांस असते. यास पंढरपूर हें अपवाद आहे. पंढरपूरच्या विठ्ठलमंदिरांतील सभामंडपाचे सर्व फरशीचे दगडांवर नांवें कोरलेलीं आहेत. आपल्याला स्वतःला जरी सत्संगति झाली नाहीं, तरी निदान आपल्या नांवास संतचरण लागावे व त्यांच्या धूलिकणांनीं आपल्या नांवास पवित्रपणा यावा, या सद्धेतूनें हजारों भाविकांनीं आपापलीं नांवें विठोबाच्या देवळांत खोदिलीं आहेत. परंतु इतर ठिकाणचा प्रकार वेगळा आहे. लोकांच्या या दुष्ट संवयीमुळें कित्येक ठिकाणांस विद्रूपता आलेली आहे. या खोडसाळ प्रकाराच्या तडाख्यांतून लेणीं सुटलीं

नाहींत. पण या आपल्या कृतीनें आपलें नांव अजरामर होईल, अशी जर या लोकांची कल्पना असली, तर तो केवळ खुळेपणा आहे. नांव अजरामर करून कीर्तीचा झेंडा दिगंतरीं फडकवीत ठेवण्याचे मार्ग वेगळे व कष्ट-साध्य आहेत. सुंदर इमारतींवर आपल्या अपवित्र हातांनीं काळिमा पाव-लेलें नांव खोदून पवित्र स्थळें विटाळणें हा अजरामरत्व संपादण्याचा मार्ग नव्हे. अशा मूर्ख लोकांच्या हातून जुन्या इमारतींच्या, देवळांच्या अगर लेण्यांच्या भिंती खराब होणार नाहींत अशी खबरदारी त्या त्या ठिकाणच्या रक्षकांनीं घेतली पाहिजे.

देवळाचें वर्णन करीत असतां मध्यंतरीं दिसून आलेल्या प्रकारावरून थोडेसें विषयांतर करणें भाग पडलें. या देवळांत किंवा त्या सभोंवतीं आपण किती जरी वेळ घालविला, तरी हें रमणीय स्थान पाहतच रहावें, असें आपणांस वाटतें. परंतु सर्वसंगपरित्याग करून आयुष्याचे बाकी राहिलेले दिवस येथेंच एकांतवासांत, योगसाधनांत किंवा हरिभजनांत घालविण्याचा निश्चय असल्याशिवाय येथें राहणें होणार नाहीं. पूर्वीं या ठिकाणीं कधीं कधीं साधु लोक येऊन राहत असत. पण आपणांसारख्या केवळ दृष्टि-सुखाचे वाटेकऱ्यांस त्या स्थलाचा लोभ सोडलाच पाहिजे. यासाठीं आतां आपण कैलासांतून निघून उत्तरेकडील पायऱ्यांनीं खालीं उतरूं व आसमं-ताद्भागीं काय शोभा आहे याचें निरीक्षण करूं.

वरून खालीं उतरून आलें ह्मणजे अनेक लहान लहान मूर्ति अगदीं एका रांगेंत चबुतऱ्याच्या उत्तराभिमुखी खालील भागाला खोदलेल्या दृष्टीस पडतात. महाभारतांत किंवा पांडवप्रतापांत वर्णन केलेल्या वेग-वेगळ्या प्रसंगाचे देखावे या चित्रांतून दाखविले आहेत. एका बाजूस पांडववीर कृष्णसखा अर्जुन रथावर आरूढ झाला असून भगवान् श्रीकृष्णानें त्याचें सारथ्य पत्करिलें आहे, व युद्धाची तयारी झाली आहे. दुसऱ्या बाजूस पांडवांचे वृद्ध पितामह भीष्म महाराज आपला असंख्य दळभार सज्ज करून रथावर चढून शरसंधान लावून तयार आहेत. या देखाव्याचें अवलोकन केलें ह्मणजे भारती युद्धांतील अनेक प्रसंगांचें स्मरण होतें. शोक-

मोहांनीं व्याप्त होऊन कर्तव्यपराङ्मुख होऊं पाहणाऱ्या अर्जुनास याच प्रसंगीं श्रीकृष्णांनीं सदुपदेश केला, व त्यास फलाशेवर दृष्टि न ठेवतां स्वकर्तव्य करावयास लाविलें. तो सदुपदेश फक्त अर्जुनाच्या कामीं आला नसून, त्याच्या श्रवणानें, मननानें व अध्ययनानें अर्जुनाप्रमाणेंच लक्षावधि लोकांचें अज्ञानतिमिर नाहींसें होऊन ते सन्मार्गाकडे वळत आहेत. असो. हा सदुपदेश जींत ग्रथित केला आहे, त्या भगवद्गीतेचें यश गाण्याचें हें स्थळ नव्हे. अर्जुन आणि भीष्म या दोघांही वीरांचे रथांला घोडे जुंपलेले आहेत. पुराणांतून रथांचें आपण जें वर्णन वाचतों, किंवा अशा चित्रांतून जे रथ आपल्या दृष्टीस पडतात, तसे रथ हल्लींच्या काळीं दुर्लभ झाले आहेत. व हल्लीं युद्धप्रसंगांत रथांचाही उपयोग करीत नाहींत. राज्यारोहणानिमित्त झालेल्या दिल्लीदरबारचे महोत्सवाचे वेळीं नाभा संस्थानचे महाराजांनीं रथ आणिले होते, असें ह्मणतात. परंतु दिवसेंदिवस या जुन्या गोष्टी नामशेष होऊन त्यांच्या ऐवजीं कमी त्रासदायक व जास्त सोइस्कर अशा गोष्टी प्रचारांत येऊं लागल्या आहेत, हा कालमहिमा आहे.

याच चबुतऱ्याच्या तळाच्या दुसऱ्या ह्मणजे दक्षिण बाजूला अशाच प्रकारच्या पण निराळा प्रसंग दाखविणारा देखावा आहे. आपण जरी दशावतारांत हिंडलों, तरी तेथें किंवा कैलासांत येऊंपर्यंत इतर लेण्यांत आपणांस कोठेंही रामायणांतील कथानकाच्या द्योतक अशा मूर्ति दृष्टीस पडल्या नाहींत. पण या दक्षिणाभिमुखी भागाला रामावतारांतील कांहीं प्रसंगाचीं चित्रें रेखाटलीं आहेत ह्मणजे खोदिलीं आहेत असेंच ह्मटलें पाहिजे. रामभक्त हनुमान रावणसभेंत जाऊन तो रावणाच्या पुढें आपल्या शेंपटाचें उंच सिंहांसन करून त्यावर रावणाच्या सिंहासनापेक्षां उच्चस्थानीं बसल्याचें अगदीं स्पष्ट चित्र आहे. कैलासांत हजारों मूर्ति खोदलेल्या आहेत, पण हनुमानाची मूर्ति फक्त याच ठिकाणीं आहे. पांडवांचीं आणि रामाचीं चित्रें फक्त येथेंच असून इतर कोठेंही नसल्यामुळें तीं मागाहून कोणीतरी कोरिलीं असावीं, असें कांहीं शोधकांचें मत आहे. तें कांहीं असो. वस्तुस्थिति जी दृष्टोत्पत्तीस येते, ती वर नमूद केली आहे.

कैलास हें देऊळ हत्ती, वाघ आणि शरभ यांच्या पाठींवर कोरिलें आहे. वरून खालीं उघड्या पटांगणांत उतरून एकदां चोहोंकडे पाहिलें ह्मणजे देवळाच्या खालीं ह्या पशूंच्या मूर्तींचीं तोंडें रांगेनेंच दिसतात व त्यांच्या शरीरांचा बाकीचा सर्व भाग देवळाखालीं झांकला गेला आहे, त्यामुळें देवळाचा सर्व भार त्यांनीं तोलून धरिला आहे असें दिसतें. अगोदरच वाटलेल्या आश्चर्यांत अशा प्रकारच्या कल्पकपणाची ही रचना पाहून आणखी चौपट भर पडते, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. देवळाभोंवतीं ज्या ओंवऱ्या आहेत, त्यांच्यांमध्यें व देवळामध्यें कमी अधिक रुंदीची पण प्रशस्त अशी सभोंवार खुली जागा आहे. ओवऱ्यांला पुढें पडवी आहे. ती आठ दहा फूट रुंद असावी. पडवीला खालीं आधार बिलकूल नाहीं, ह्मणजे तिला खांब मुळींच ठेविलेले नाहींत व वर एकसारखा उंच डोंगर आहे. तो इतका उंच आहे कीं, त्याचें टोंक पाहण्यासाठीं खालून पाहणारास बरेंच मागें सरून मान फार वांकवावी लागते. पडवीचा वरील भाग थेट टोंकापर्यंत जणों काय करवतीनें नीट कापीत नेला आहे इतका तो सुळक्यासारखा आहे. पडवीखालून चालत असतां, ही अधांतरीं लोंबत असलेली पडवी जर अवचित कोठें ढांसळली, तर खालीं सांपडणाऱ्या माणसाचा मागमूसही लागणार नाहीं, अशा प्रकारची भीति वाटून माणूस जरा सावधगिरीनें थोडा बाजूनें चालावयास लागतो. इतक्यांत थोडें पुढें सरल्यावर दक्षिणेकडील पडवीचा एक जंगी धलपा पडलेला पाहतांच तो दचकतो! हा धलपा केव्हां पडला असावा याची चौकशी आह्मीं वेरुळांतील एका वयोवृद्ध गृहस्थापाशीं केली. पण त्याच्या आठवणीपूर्वीं तो पडलेला आहे, असें आह्मांस सांगण्यांत आलें.

देवळाभोंवतीं तीन बाजूंस ज्या ओवऱ्या आहेत, त्या फक्त एकेरी सोप्याच्या आहेत. पुढें खांब असून पुनः भिंतींतच डोंगराच्या आंगचे खांब दाखविले आहेत. या ओवऱ्यांतील मूर्ति लक्ष्यपूर्वक पाहण्यासारख्या आहेत. आपण उत्तरेकडील ओवरींत प्रथम जाऊं. हिला पुढच्या बाजूस पंधरा खांब आहेत. पहिल्या दोन खणांत मुळींच मूर्ति खोदलेली नाहीं. त्याच्यापुढें

ह्मणजे तिसऱ्या व चवथ्या खांबांच्या दरम्यान पहिलें चित्र खोदलेलें आहे. चित्राचे दोन भाग आहेत. वरील भागांत शिवलिंग असून त्या सभोंवतीं माणसांचीं नऊ मुंडकीं आहेत. हीं सगळीं रावणाचीं मुखें आहेत. आपलें आराध्यदैवत प्रसन्न करून घेण्याकरितां त्यास त्यानें तीं अर्पण केलीं आहेत. रावणाची मूर्ति खालच्या बाजूस खोदलेली असून त्याच्या हातांत खड्ग दिलेलें आहे. आपलें शेष राहिलेलें मुख अर्पण करण्याकरितां त्यानें तें शस्त्र मानेवर ठेविलें आहे. आपला भक्त आतां, आपण जर त्यास दर्शन दिलें नाहींतर, प्राणत्याग करणार, तेव्हां त्याचा अधिक अंत पाहूं नये, त्याच्या निस्सीम भक्तीची कसोटी लागली आहे, ह्मणजे प्राण्यास प्राणापेक्षां ज्यास्त प्रिय असें दुसरें कांहीं नाहीं, तो प्राण सुद्धां अर्पण करण्यास रावण तयार झाला आहे, असें पाहून शिव प्रसन्न होतो आणि भक्ता, तुला काय वर मागावयाचा असेल तो खुशाल माग, असें ह्मणतो. बरेच दिवस एखाद्या ठिकाणीं तपश्चर्या करून अथवा अनुष्ठान करूनही आपलें इष्ट दैवत प्रसन्न होऊन इच्छित मनोरथ सिद्धीस जात नाहींत, असें पाहून देहत्याग करावयास अथवा अग्निकाष्ठ भक्षण करण्यास सिद्ध झाल्याबरोबर देव प्रसन्न झाल्याच्या कथा पुराणांतरीं आहेत. त्यांपैकींच हा एक मासला आहे. रावण हा आपल्या धन्याची मर्जी सुप्रसन्न करून घेऊन त्याचेंच घर घेऊं पाहणाऱ्यांपैकीं एक होता! अशीं माणसें जगांत थोडीं थोडकीं नसतात. रावणानें सार्वभौमराज्य, अमरत्व, पार्वती आणि शिवलिंग हीं मागितलीं. शिवानें अर्थातच त्याची इच्छा तृप्त केली. मिळालेली देणगी घेऊन रावण मोठ्या आनंदानें चालला असतां, वाटेंत त्याला ब्राह्मणाचा वेष घेऊन विष्णूनें गांठलें. जेव्हां जेव्हां देवांवर एखादें संकट येऊन गुजरतें, तेव्हां त्यांची त्यांतून सुटका करण्याकरितां ही स्वारी पुढें सरसावते, अशा कथा पुराणांत आहेत. शिवानें दिलेल्या देणग्या पाहून सर्व देवांचें धाबें दणाणून गेलें व शिवाची स्तुति करून या सर्व देणग्या परत घेण्याची त्यास हात जोडून त्यांनीं विनंती केली. शिवानें सर्व देवांचें ह्मणणें ऐकून घेऊन आतां माझ्या हातांत कांहीं राहिलें नाहीं, तुह्मी विष्णूकडे जा, तो तुमचें संकट

निवारण करील, असें सर्व देवांस सांगितलें. त्यांनीं विष्णूची प्रार्थना केली. ती ऐकून अर्थातच विष्णूस आपली सुखशय्या सोडून देऊन धांवावें लागलें. विष्णूला आपल्या कार्यांत यश आलें हें उघडच आहे. शिव आणि पार्वती पुढील देवळीच्या वरच्या भागांत असून खालीं विष्णू आणि रावण दाखविले आहेत.

विष्णूनें रावणाच्या हातून पार्वतीस सोडविल्यानंतर ती आपलें पूर्वीचें स्थान प्राप्त होण्याकरितां लिंगार्चन करीत आहे. शिवलिंगाच्या दोन्ही बाजूस दोन मूर्ति आहेत, खालच्या बाजूस नंदी आहे अशा देखाव्याचें तिसऱ्या देवळींत प्रदर्शन आहे. याप्रमाणें शिवलिंगाची आराधना केल्यावर पार्वती पुनः कैलासांत शिवासन्निध गेली आहे. पण शिव तिला पाहून पाठ फिरवीत आहे. रावणासारख्या परपुरुषाचा सहवास घडल्यामुळें अंगिकार करण्यास तूं अयोग्य आहेस, असें आपल्या कृतीनें तो दाखवीत आहे. पार्वतीनें आपल्या जवळ येण्याचा निश्चय केला आहे, असें पाहून शिव कैलासांतून उडी टाकण्याच्या बेतांत असून त्या कामीं पार्वती प्रतिबंध करीत आहे व खालच्या बाजूस त्या दोघांकडे पहात असलेला नंदी आहे, या कथानकाची आठवण करून देणारा देखावा चवथ्या देवळींत आहे.

पांचव्या देवळींत स्वामीकार्तिकाची मूर्ति आहे. परंतु मागील देवळींतील देखाव्याशीं या मूर्तीचा संबंध कसा जुळतो हें समजत नाहीं. पुढें पार्वती असून तिच्याजवळ एक पुरुषमूर्ति असून ती कांहीं वेदमंत्रांचे उच्चार करीत आहे व पार्वती ते लक्ष्य लावून आपल्या शुद्धीसाठीं श्रवण करीत आहे, असें दाखविलें आहे. याच्या पुढील देवळींत फक्त एका पुरुषाची मूर्ति आहे. त्यास मार्कंडेय ऋषि ह्मणतात. आठव्या देवळींत शिव आणि पार्वती आहेत. पार्वतीनें आपला एक हात शिवाच्या हातांत घातला आहे. शिव पार्वतीशीं बोलत आहे व खालीं एका मूर्तीनें कैलासास तोलून धरिलें आहे. आपली प्रियपत्नी पार्वती एकनिष्ठ पतिव्रता आहे, याबद्दल शिवाची पूर्ण खात्री होऊन त्यानें तिचा अंगिकार केला आहे, हें शिवानें आपला डावा हात पार्वतीच्या खांद्यावर टाकून तिला कुरवाळिलें

आहे, यावरून स्पष्टपणें दर्शविणारा देखावा नवव्या देवळींत आहे. दहाव्या देवळींत शिव आणि पार्वती बसले असून शिवानें आपल्या हाताचें एक बोट उभें धरिलें आहे व पार्वतीही आपलें हस्तकमल उघडें धरून निषेध व्यक्त करीत आहे; खालच्या बाजूस नंदी असून शिवगणाचा समुदाय सभोंवतीं आहे; त्यांपैकीं एक जण नंदीची तंगडी ओढीत आहे असें दाखविलें आहे. पुढें शिवाची मूर्ति असून तिच्या हातांत नाग आहे.

आतां आपण या ओवरींतील शेवटच्या ह्मणजे बाराव्या देवळीजवळ येऊन पोंचलों. येथें काय काय आहे तें अवलोकन करूं. एक शिवोपासक ब्राह्मण शिवलिंगाची पूजा करण्यांत तल्लीन झाला असून त्याच्या मागें एक मूर्ति त्या ब्राह्मणाच्या गळ्याला फांस घालून त्याला मारण्याची संधि साधण्यासाठीं टपून आहे. आतां फांस घालणार, तोंच लिंगांतून महादेव प्रकट होऊन एकपाय लिंगांतच आहे इतक्यांत दुसऱ्या पायानें त्या नराधम दुष्टाला खालीं पाडून त्याजवर त्रिशुलाचा त्यांनीं प्रहार केला आहे. शिवाच्या हातांत नेहमींचीं आयुधें दृग्गोचर नसून त्याऐवजीं मानवांचीं मुंडकीं खोदलीं आहेत. याप्रमाणें पहात पहात आपण ह्या ओवरीच्या शेवटापर्यंत येऊन पोंचलों.

आतां आपण पूर्वेच्या ओवरींत वळूं. या ओवरीची लांबी १८५ फूट आहे, रुंदी १३ फूट असून उंची १४।१५ फूट आहे. हिला पुढें अठरा खांब असून पुढें बिनखांबी अशी वर वर्णन केलेली पडवी आहे. प्रत्येक खणांत एक अशा एकोणीस ठिकाणीं या ओवरीमध्यें निरनिराळ्या मूर्ति आहेत. पहिली मूर्ति शिवाचीच आहे. दोन मूर्ति येथें आहेत. त्या शिव आणि पार्वतीच्याच असाव्या. यांपैकीं एक मूर्ति उभी व दुसरी बसलेली आहे. व जणों काय एक दुसऱ्यास वचन देत आहे अशा रीतीनें शिव पार्वतीच्या हातावर टाळी देत आहे. मागील चित्रांशीं संबंध जुळवून पाहिलें, तर कथानकाच्या ओघानें असें दिसतें कीं, आतां इतःपर कोणीं कशीही तपश्चर्या केली तरी, व मी आपल्या भक्तावर कितीही सुप्रसन्न झालों तरी, तुला अपर्णेला त्याला अर्पण करणार नाहीं, असें शिव पार्वतीस सांगत आहे, हें ह्या चित्रांत दाखविलें आहे. बसलेली मूर्ति ब्रह्मदेवाची असून तो शिवानें दिलेल्या वचनास साक्षीदार आहे.

दुसरी देवळी. मध्यभागीं वीरभद्राची मूर्ति असून भोंवताली लहान लहान मूर्ति आहेत. वीरभद्र हा शिवाचाच अवतार आहे. त्याच्या गळ्यांत रुंड माळा असून एका हातांत डमरू व दोन हातांत त्रिशूळ धरून तो रक्तासुर दैत्याचे शरीरांत त्यानें खुपसला आहे. ह्या दैत्याला असा वर मिळाला होता कीं, त्याच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबापासून एक एक दैत्य उत्पन्न होऊन शत्रूचें पारिपत्य करण्यास त्यास साह्य करील. ह्मणून त्याचें रक्त खालीं पडूं नये यासाठीं वीरभद्रानें आपल्या एका हातांत एक प्याला धरून तें रक्त त्याचें त्याला पाजीत आहे. वीरभद्राचीं चित्रें वेरूळच्या लेण्यांतून फार ठिकाणीं आहेत. पण सगळ्यांत मोठी मूर्ति पुढें डुमाळ लेण्यांत आहे.

तिसऱ्या देवळींत एका रथावर आरूढ झालेली एक मूर्ति आहे. तिला सहा हात आहेत. ती मूर्ति उभी असून दोन हातांनीं धनुष्यबाण टणत्कारीत आहे. एका हातांत त्रिशूळ असून रथाच्या बाजूला नंदी आहे. रथाला चार घोडे आहेत. ब्रह्मदेव सारथी आहे. अशा तयारीसह शिव त्रिपुर दैत्याचा वध करण्यास निघाला आहे असें दाखविलें आहे. पुढें सरकलें ह्मणजे शिव आणि पार्वती बसले आहेत, खालीं नंदी आहे, शिवाच्या हातांत त्रिशूळ व डमरू असून त्यानें आपला डावा हात आपली अर्धांगी पार्वती हिच्या खांद्यावर टाकला आहे, असा देखावा दृष्टीस पडतो.

पुढच्या देवळींत फक्त एक उभी मूर्ति आहे. ती चतुर्भुज असून तिच्या हातांत गदा व पद्म आहेत. यावरून ही विष्णूची मूर्ति आहे हें उघड होतें. पुढें स्तंभांतून प्रकट झालेली नरसिंह मूर्ति आहे. हिरण्यकश्यपु राक्षसानें आपल्या ईश्वरभक्त पुत्राचा अतिशय छळ केला. परंतु तो भक्तराज प्रल्हाद आपली निष्ठा ढळूं देत नाहीं, असें पाहून तुझा तो सर्वव्यापी, सर्वांतरात्मा देव सर्व चराचर विश्व व्यापून राहिला आहे असें ह्मणतोस तर तो दाखीव, असें त्यानें प्रल्हादास ह्मटलें. प्रल्हादानें तो खांबांत सुद्धां आहे असें ह्मटल्यावर हिरण्यकश्यपूनें मदोन्मत्तपणानें खांबावर लाथ

मारिली. त्याबरोबर आपल्या भक्तांचे शब्द अक्षरशः खरे करणारा ईश्वर प्रगट होऊन त्यानें आपल्या भक्ताचें संरक्षण केलें आहे.

रावणानें मदांध होऊन सर्व देवांस आपल्या बंदीखान्यांत टाकिलें होतें. त्या सर्वांना सोडवून रावणाचा संहार करण्यासाठीं भगवंतास रामावतार घेणें भाग पडलें. त्या रावणाच्या बंदीखान्याचीं कांहीं चित्रें येथें आपल्या दृष्टीस पडतात. ब्रह्मदेव शृंखलाबद्ध आहे, तशीच शिवाचीही दुर्दशा उडाली आहे. आणि प्रत्यक्ष विष्णुही पुढें कारागृहदुःख भोगीत आहे, असें दृष्टीस पडतें. दहाव्या देवळींत शिवानें हातांत नाग धरिला आहे व जवळच नंदी आहे. पुढें ब्रह्मदेव असून त्याजवळ हंस आहे. ब्रह्मदेवाचीं फक्त तीन तोंडेंच दृग्गोचर आहेत. कदाचित् ही दुसऱ्या एखाद्या देवाची मूर्ति असेल.

येथून पुढें शिवाचे जे आठ अवतार आहेत त्या अष्ट भैरवांच्या मूर्ति खोदलेल्या आहेत. पहिली मूर्ति उभी असून हात मोकळे आहेत. या मूर्तीच्या पायापाशीं एक मेंढा खोदलेला आहे. पण त्याला नंदी असें ह्मणतात. सगळ्या मूर्ति उभ्या खोदल्या असून कांहींच्या हातांत त्रिशूळ आहेत. एका भैरवाजवळ एक स्त्रीमूर्ति उभी असून तिच्या मस्तकावर त्यानें आपला डावा हात ठेविला आहे. एकाचा डावा हात एका स्त्रीनें धरिला आहे. काशीखंड ज्यांनीं वाचिलें किंवा श्रवण केलें असेल, त्यांना या अष्ट भैरवांच्या कथा माहीत असतीलच. त्या अष्ट भैरवांचीं नांवें, कालभैरव, क्रोधभैरव, चंडभैरव, प्रचंडभैरव, रुरुभैरव, उन्मत्तभैरव, असंहारभैरव व संहारभैरव अशीं आहेत.

इतकें पहात पहात आल्यावर आपल्याला दक्षिणेकडील ओवरी लागते. या ओवरीच्या पडवीचा धलपा पडल्याचें वर सांगितलें आहेच. ही ओवरी कमी लांबीची आहे. हिला दहा खांब शाबूद असून वरील डोंगराचा भाग पडल्यामुळें तीन खांब पडले आहेत. एकंदर बारा देवळ्या असून त्यांत चित्रें खोदलेलीं आहेत. पहिल्या देवळींत अर्धनारीनटेश्वराची मूर्ति आहे.

ती उभी आहे, मूर्तीचा निमा भाग पुरुषाचा व निमा स्त्रीचा आहे. शिवाचा जो भाग आहे त्या बाजूस नंदी आहे. एकंदरींत सृष्टिक्रमांत स्त्रीजातीचें किती महत्व आहे हें शंकरानें अर्धनारीनटेश्वराचा अवतार घेऊन सर्व जगास महशूर केलें. नारी ह्मणजे स्त्री कमी योग्यतेची, खालच्या पायरीची नसून तिचें महत्व पुरुषाइतकेंच आहे हें अर्धनारीनटेश्वरानें व्यक्त केलें नाहीं काय? तेव्हां स्त्रियांना तुच्छ न मानितां त्यांना मान द्यावा, आपल्या बरोबरीचें मानावें हें शंकरानें वरील रूप धारण करून शिकविलें आहे, हें उघड होतें. परंतु कांहीं कारणांमुळें स्त्रियांचें महत्व पुरुषवर्गानें नाहींसें केलें. हा अन्याय झाला आहे, ज्यांना समान हक्क मिळण्याची जगाच्या उत्पत्तीपासून सनद मिळाली आहे, त्यांच्या हक्कांची पायमल्ली करणें रास्त नाहीं, हें वेळोवेळीं साधुश्रेष्ठांच्या लक्षांत येऊन त्यांनीं त्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला आहे. साधुवर्य नाथ महाराज यांची स्त्रीशूद्रांविषयीं किती पूर्ण कळकळ होती, हें त्यांनीं आपल्या वर्तनांत व लेखांत स्पष्ट केलें आहे. आमचे लोक जर डोळे उघडून आपल्या भोंवतीं काय चाललें आहे, व आपली पूर्वस्थिति काय होती याचें पूर्ण ज्ञान करून घेण्याच्या हेतूनें ग्रंथांचें अवलोकन करितील, तर निरनिराळ्या अवतारांपासून त्यांस पुष्कळ बोधप्रद गोष्टी कळून येतील व एकंदरीनें समाजाचें अज्ञान नाहींसें होऊन राष्ट्राच्या प्रगतीस चांगला जोर मिळेल.

यापुढील देवळींत शिव असून खालीं नंदी आहे. याच्यापुढें एक चतुर्मुख आणि चतुर्भुज मूर्ति आहे. ती आपल्या दोन हातांनीं एका खांबास कवटाळीत आहे. एका हातांत खड्ग असून चवथ्या हातांत माळ आहे. ही ब्रह्मदेवाची मूर्ति आहे असें सांगण्यांत येतें. पण ब्रह्मदेवाला खांबाला कवटाळण्याचें कारण काय असावें, याचा उलगडा होत नाहीं. पुढील चित्रांशीं जर याचा संबंध जुळविला तर हें नरसिंह अवताराच्या अगोदरचें चित्र असावें, असें वाटतें. कारण पुढें लागलीच स्तंभांतून नरसिंह मूर्ति प्रगट होऊन हिरण्यकश्यपूचा वध करीत आहे, हा देखावा दृष्टीस पडतो. पांचवी मूर्ति शेषशायी भगवान् श्रीकृष्णाची आहे. भगवंतांनीं

शेषावर शयन केलें आहे. शेषानें आपल्या सात फण्यांनीं भगवंतांच्या मस्तकावर छाया धरिली आहे. भगवंतांच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव निघाला आहे.

शेषशायीचें दर्शन झाल्यावर आतां त्याचे कांहीं अवतार आपल्या अवलोकनांत येतात. प्रथम कृष्णाची मूर्ति आपल्या दृष्टीस पडते. गोपाळकृष्ण या नांवास सार्थकता आणणारा देखावा या चित्रानें व्यक्त केला आहे. कृष्णाभोंवतीं जीं गाईंचीं चित्रें खोदलेलीं आहेत, तीं चांगलीं आहेत. पुढच्या ह्मणजे सातव्या देवळींत वामन अवताराचें चित्र दाखविलें आहे. या मूर्तीला सहा हात असून चार हातांत शंख, चक्र, गदा, खड्ग असून पांचव्या हातांत ढाल आहे. आणि साहाव्या हाताचें एक बोट पुढें करून ती कांहीं बोलत आहे असें व्यक्त केलें आहे. बळिराजाची सत्ता अपार वाढून तो गर्विष्ठ बनला. तेव्हां त्याचा गर्व नाहींसा करण्याकरितां भगवंतांनीं वामन अवतार घेतला. एका ब्राह्मण बटूचा वेष घेऊन बळीकडे भगवान् आले, व त्याजवळ दक्षणा मागूं लागले. त्यावर बळिराजानें त्यास देण्याकरितां रत्नांनीं भरलेला एक प्याला पुढें केला असें या चित्रांत दाखविलें आहे. परंतु वामनानें त्याचा स्वीकार न करितां आपल्या साडेतीन पावलांत जितकी भूमि मावेल तितकी मागितली. राजानें वामनाचें मागणें कबूल केल्यावर वामनानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यानें दोन पावलांत सर्व पृथ्वी व्यापून टाकिली आणि एक पाऊल राहिलें तें बळीच्या मस्तकावर पाय ठेवून त्यास पाताळांत घातलें. मूर्तीकडे लक्ष्यपूर्वक पाहिलें ह्मणजे वामन लांब पाऊल टाकित आहे, असें स्पष्ट चित्र खोदिलें आहे, असें दिसून येतें.

यापुढें गरुडावर आरूढ झालेल्या विष्णूची मूर्ति आहे. नंतर वराह अवताराची मूर्ति असून वराहानें आपल्या सुळ्यांनीं पृथ्वी उचलून धरिली आहे, असें दाखविलें आहे. यमुनेच्या डोहांत 'कृष्ण बुडाला, बुडाला' अशी एकच आरोळी संवगड्यांनीं ठोकिली असतां यमुनेच्या डोहांत शिरून काळिया नांवाच्या सर्पाच्या छातीवर उभे राहून त्याचें शेपूट हातांत

धरून थयथय नाचून त्याचें मर्दन कृष्णानें केलें, या पुराणांतरीं असलेल्या कथेंतील कालियामर्दनाचा देखावा दहाव्या देवळींत आहे. पुढें रावणपुत्र इंद्रजित याचा वध आहे. यापुढील देवळींत अन्नपूर्णेची मूर्ति आहे. अन्नपूर्णा हें पार्वतीच्या एका अवताराचें नांव आहे. अन्नपूर्णा प्रसन्न असल्यास धन्यधान्यसमृद्धि सदैव असावयाची अशी सार्वत्रिक समजूत आहे.

या पडवींतून आतां आपण बाहेर पडूं. थोडें वर चढून गेलें ह्मणजे लंका नांवाचें लेणें लागते. त्यांत विशेष पाहण्यासारखें कांहीं नाहीं. खालीं उतरून दरवाज्याच्या बाजूकडे वळलें असतां एक चिंचोळें लांबट असें लेणें आहे. त्यास नवरात्र असें ह्मणतात. आंत जीं चित्रें खोदलेलीं आहेत त्यांत गणपतीची मूर्ति प्रमुख आहे. प्रत्येकीजवळ मूल अशीं स्त्रियांचीं सात चित्रें आहेत. एक लठ्ठशी पुरुषाची मूर्ति आहे. लेण्याच्या तिन्ही बाजूंस भिंतींत बाकासारखें बसण्यास खोदलें असून त्यावर या सर्व मूर्ति बसल्या आहेत. ह्या सर्व मूर्ति फारच उमटून स्पष्ट खोदल्या असल्यामुळें त्या पुतळ्याप्रमाणें दिसतात. या बाकापुढें प्रत्येक मूर्तीखालीं त्या त्या मूर्तीचें वाहन खोदलेलें आहे.

नवरात्रीला लागूनच आणखी एक लेणें आहे, त्याचा आकार सुतार-झोंपडीसारखा आहे. ह्मणजे त्याचा वरील भाग कमानीचा आहे. अशा प्रकारचीं जेवढीं ह्मणून लेणीं आहेत, तीं सर्व बुद्धाचीं आहेत. परंतु यांत बुद्धाची मूर्ति नसून आंत शिवलिंग आहे. लेण्याच्या आंतील भाग साधा असून कोठें मूर्ति वगैरे खोदलेली नाहीं. या लेण्याच्या समोरच्या बाजूस उत्तरेकडे हुबेहुब असेंच लेणें कोरण्याचा प्रयत्न झाला असावा, असें तेथें थोडें कोरलें आहे त्यावरून अनुमान बांधण्यास जागा आहे. या जागेच्या खालीं कांहीं लहान लहान गुहा आहेत. तेथें पूर्वीं योगसाधन करण्याकरितां तापसी लोक राहत असत अशी दंतकथा आहे.

गजाकांत लक्ष्मीच्या पुढून पुनः आपण उत्तरेच्या बाजूला गेलों ह्मणजे पुढें पटांगणांत भिंतीवर पूर्वाभिमुखी विष्णूचें गरुडवाहनी चित्र दृष्टीस

पडतें. त्यापुढें पायऱ्या चढून गेल्यावर एक विस्तृत असें लेणें खोदलेलें आहे. त्याला लंका ह्मणतात. तें १०६ फूट लांब व ७२ फूट रुंद आहे. त्यांत ३२ खांब आहेत. ते सुंदर असून त्यावर नकशी फार सुरेख खोदलेली आहे. हें लेणें जरा ठेंगणें आहे व आंत जितका प्रकाश असावा तितका नाहीं. या लेण्यांत मध्यभागीं गाभाऱ्यांत शिवलिंग असून त्याला लंका हें नांव आहे. लंका हें नांव कसें पडलें याचा उलगडा करणें कठीण आहे. ह्या ठिकाणीं जीं चित्रें खोदिलीं आहेत तीं बहुतेक ओवऱ्यांत पाहिलेल्या मूर्तींसारखींच ह्मणजे त्यांचीच पुनरावृत्ति आहे. यांपैकीं कांहीं विष्णूचे अवतार असून कांहीं शिवाचे आहेत. एका देवळींत गणपतीची मूर्ति मात्र फार मोठी आहे, व मध्यभागीं भिंतींत जी सर्वांत मोठी देवळी आहे तींत ब्रह्मा विष्णु आणि महेश अशा तीन मूर्ति उभ्या आहेत असें दाखविलें आहे. एके ठिकाणीं एक त्रिमुखी आणि षड्भुज मूर्ति खोदलेली आहे. मध्यभागीं असलेलें लिंग फुटलेलें आहे. वर सभामंडपांत शिरतांना कांहीं बीभत्स चित्रें आहेत. अशीं चित्रें बऱ्याच ठिकाणीं आहेत. पण त्यांचें वर्णन देण्याचें प्रयोजन नाहीं ह्मणून तें अजिबात वगळलें आहे. कदाचित् हीं बीभत्स चित्रें मागाहून कोणीं कोरिलीं असतील असें वाटतें. कांहीं हेमाडपंती देवळांतून जो त्यांचा सुळसुळाट असतो, तसा प्रकार येथें नाहीं ही मोठी समाधानकारक गोष्ट आहे.

कैलासांत शिरण्यास जो मार्ग आहे तेथें पूर्वीं फार टोलेजंग महाद्वार होतें. त्याच्यापुढें एक मुसलमानी इमारत आहे. ती चौकोनी असून तिला डोम आहे. या इमारतीच्या दक्षिणेस एक चबुतरा आहे. त्याजविषयीं वेरूळचे लोक असा इतिहास सांगतात कीं, अवरंगजेब बादशहानें लेण्यांची जी नासधूस केली, मूर्ति ज्या छिन्नभिन्न केल्या, त्यामुळें त्याजवर ईश्वरी कोप झाला व त्याची बायको मेली. देवाचा राग शमविण्याकरितां अवरंगजेबानें डोमाची खोली बांधली, पुढें त्याचा मुलगा वारल्यावर त्यानें चबतुरा केला आणि त्याचा आवडता घोडा मेल्यावर त्यानें दरवाजा करविला तरी पण त्याच्या पापाची त्यास क्षमा झाली नाहीं व अखेर तोही

मरण पावला! अहमदनगर शहराजवळील शहासरीफच्या दरग्यांतील मुसलमान लोकही अवरंगजेबासंबंधानें अशाच प्रकारची गोष्ट सांगतात.

ज्याची सर्व लेण्यांत विशेष ख्याति आहे, असें कैलास पाहून आतां आपण बाहेर पडूं. कैलासाची शोभा, त्याचें सौंदर्य, त्याचा भव्यपणा, विशाळपणा व विस्तार यांची थोडी फार कल्पना वरील वर्णनावरून वाचकांस होईल. पृथ्वीच्या पाठीवर जे अनेक चमत्कार आहेत त्यांत गण्यास योग्य अशीं हीं लेणीं आहेत, विशेषतः कैलास हें तर आहेच. त्यांत दिसून येणारी विशाळ व आश्चर्यकारक कल्पकता, विलक्षण हस्त-कौशल्य व दीर्घोद्योग हीं पाहून त्यांच्या उत्पादकांना धन्यवाद दिल्याशिवाय रहावत नाहीं. कैलासाचें मूर्तिमंत चित्र उठविणें अत्यंत दुर्घट आहे. तसा प्रयत्न जरी कोणीं केला तरी तो वृथाशीण होणार आहे, अशी आमची समजूत आहे. ज्या कल्पकांनीं हें जंगी काम केलें, त्यांच्या कल्पकतेची, बुद्धिसामर्थ्याची, कारागिरीची, दीर्घोद्योगाची व कार्यक्षमतेची कमाल आहे. मोठेपणा मिळविण्यास व आपलें नांव अजरामर करून ठेविण्यास जे आवश्यक गुण लागतात ते सर्व, आपल्या ज्या पूर्वजांनीं हीं लेणीं कोरिलीं त्यांचे आंगीं वसत होते. आमची व दीर्घोद्योगाची हल्लीं ओळख बुजाल्यामुळें व त्याची कल्पना करण्याइतकीही आमची बुद्धि तीव्र नसल्यामुळें हीं लेणीं मानवांनीं कोरिलीं नसून तें देवादिकांचें कृत्य आहे, असें आह्मी ह्मणावयास लागलों. हल्लींची आमच्या समाजाची शोचनीय अवस्था, धाडसाचा अभाव, उद्योगाचा दुष्काळ, कल्पकतेचें अवर्षण व बुद्धिमत्तेची महर्गता वगैरे पाहून लेणीं हल्लींच्या हिंदूंच्या पूर्वजांनीं खोदिलीं असतील या गोष्टीवर भरंवसा ठेवण्यास परकीयांस कठीण वाटत असलें तर त्यांत फारसें नवल नाहीं!

असो. कैलासाचें वर्णन संपवितांना प्रसंगानुसार सुचलेले विचार वर नमूद केले आहेत. शेवटीं कैलासाविषयीं इतकें सांगणें जरूर आहे कीं, त्याची खरी कल्पना येण्यास तो प्रत्यक्ष डोळ्यानें पाहिला पाहिजे. ज्याला ह्मणून थोडाफार खर्च करण्याची ऐपत आहे त्यानें जन्मास येऊन एक

वेळ वेरूळचीं लेणीं पाहिल्याशिवाय राहूं नये अशी आह्मी मोठ्या आग्रहानें शिफारस करितों.

## खुर्द रामेश्वर.

कैलासांतून बाहेर पडल्यावर सुमारें पन्नास पाऊणशें पावलांच्या अंतरावर थोडें वर चढून गेलें ह्मणजे एक लहानसें लेणें लागतें. त्यास खुर्द रामेश्वर हें नांव आहे. हें लेणें व याच्या पुढील आणखी दोन लेणीं कोणास फारशीं दाखविण्यांत येत नाहींत, व कोणी बहुतकरून पाहतही नाहींत. कदाचित् हीं लहान असल्यामुळें लोकांचें त्यांकडे दुर्लक्ष्य होत असेल, किंवा कैलास पाहून मनावर जो एक प्रकारचा परिणाम होतो त्यामुळें कैलासापुढें आतां बाकीचीं लेणीं तुच्छ असलीं पाहिजेत असाही पाहणाऱ्याचा ग्रह होण्याचा संभव आहे. तो जरी बऱ्याच अंशीं यथार्थ असला, तरी येथून पुढचीं सर्व लेणीं दुर्लक्ष्य करण्यासारखीं आहेत, असें समजूं नये.

खुर्द रामेश्वर हें शिवाचें लेणें आहे. मध्यभागीं शिवलिंग आहे. लेण्याला फक्त चार खांब आहेत. पुढील पडवीला फक्त एक खांब शिल्लक राहिला असून बाकीचे सर्व पडलेले आहेत. या लेण्यांतून शेजारच्या लेण्यांत जाण्यास एक खिडकी आहे. तिच्यांतून गेलें असतां जें लेणें लागतें त्यास शिवलिंग ह्मणतात. तें अगदीं साधें आहे. पुढील लेण्यासही नंबर २ चें शिवलिंग असें ह्मणतात. त्यास १२ खांब असून लेणें साधें आहे. या दोन्ही लेण्यांत लिंगाच्या मागच्या बाजूस त्रिमुखी मूर्तीचा मुखवटा खोदलेला आहे.

## रामेश्वर.

यानंतर थोडें अंतरावर खालीं उतरून गेलें असतां रामेश्वर हें लेणें लागतें. लेण्याच्या बाहेरच पडवीसारख्या भागांत स्वच्छ आणि गोड पाण्याचें सुंदरसें टाकें आहे. कैलासांत व इतर लेण्यांत फिरून जे श्रम झाले असतील त्यांचा परिहार जलप्राशनानें करून व किंचित् विश्रांति घेऊन

रामेश्वरांत प्रवेश करावा. हें लेणें फारसें मोठें नाहीं तरी शोभिवंत असून त्याचें काम फार सुबक आहे. मध्यभागीं असलेला गाभारा सोडून त्याची लांबी ९० फूट आहे व रुंदी २५।२६ फूट आहे. अगदीं पुढच्या बाजूला कांहीं बीभत्स चित्रें खोदलेलीं आहेत. मध्यभागीं गाभाऱ्यांत शिवलिंग आहे. त्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा घालण्यास जागा आहे.

आंत गेल्यावर प्रथम डाव्या हाताला कार्तिकस्वामीची मूर्ति आहे. तिच्या पायांशीं राजहंस आहे, कारण कार्तिकस्वामी हा ब्रह्मचारी आहे. पार्वतीचा पिता दक्षराजा, त्याच्या उजव्या हातास आहे. त्याला मेंढ्याचें मुख आहे. दक्षराजा यज्ञ करीत असतां तेथें पार्वती आली. त्या वेळीं तिचा त्यानें अनादर केला ह्मणून महादेवास कोप येऊन त्यानें दक्षाचा शिरच्छेद केला; पण पुढें वीरभद्रानें त्यास मेंढ्याचें मुख दिलें. या देखाव्यामध्यें रामसीताविवाह दाखविला आहे असें सांगण्यांत येतें, व कांहींनीं हें जनक राजाच्या लग्नाचें चित्र आहे असें ठरविलें आहे. परंतु प्रत्यक्ष चित्रावरून व पुढील देखाव्यावरून त्याचा संबंध शंकरपार्वतींशीं आहे हें अगदीं उघड होतें.

पुढें पुष्कळ मूर्ति असून मध्यभागीं ज्या मूर्ति आहेत त्या राम आणि सीता यांच्या असून त्यांचा विवाह होत आहे असें सांगण्यांत येतें. परंतु खालच्या बाजूस लहान लहान अशा बऱ्याच मूर्ति आहेत व मुख्य पुरुष मूर्तीला तृतीय नेत्र आहे हें लक्षांत आणिलें ह्मणजे व शिवाय शिव आणि पार्वतीच्या लग्नाचीं जीं चित्रें इतर ठिकाणीं खोदिलीं आहेत त्यांशीं याचें साम्य आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली ह्मणजे या कोणाच्या मूर्ति आहेत, याचा निर्णय करणें कठीण पडणार नाहीं. याच भिंतीवर पूर्वेकडील टोंकास सात मूर्ति आहेत. त्यांपैकीं दोघांचीं डोकीं मध्यें निमी हजामत केलेलीं व दोन्ही कानावर अर्धवर्तुलाकृति केंस ठेवलेलीं आहेत.

आतां आपण शिवलिंगाच्या उजवे बाजूस वळूं. प्रथमच महिषासुरमर्दिनी भवानीचें चित्र आहे. महिषासुर नांवाच्या दैत्यानें फारच प्रळय

मांडिल्यावर जगदंबेनें त्याचा वध केला असें दाखविलें आहे. या गोष्टीच्या स्मरणार्थ हिंदुलोक दरसाल दसऱ्याचा सण पाळित असतात. पुढें रावण आपल्या अनेक डोक्यांनीं व हातांनीं कैलास उचलून नेण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याच्या तोंडांपैकीं एका तोंडास गाढवाचें तोंड आहे असें दाखविलें आहे. अनेक डोकीं असलीं आणि शेंकडों हात असले व माणसाचें डोकें--शहाणपण--नसलें तर कांहीं उपयोग होत नाहीं, हें दाखविण्यासाठीं कारागिरानें गर्दभमुखाची योजना केली असावी, हें उघड दिसतें! कारागिराची योजकता खरोखर वाखाणणी करण्यासारखी व बोध घेण्यासारखी आहे.

शिवलिंगाच्या डाव्या बाजूस शंकर आणि पार्वती सारिपाट खेळण्यास बसलीं आहेत व भोंवतीं शिवगण व नंदी आहेत, असा देखावा खोदला आहे. पट आणि फांसे हल्लीं प्रचारांत असलेल्या पट आणि फांशा-प्रमाणें खोदले आहेत. हा खेळ खेळत असतांनाच दोघांचें भांडण होऊन शिवानें पार्वतीला सोडून पुढें अरण्यवास केला आहे. पुढें पार्वतीनें भिल्लिणीचा वेष घेऊन त्याचें मन वळवून परत आणिलें आहे, अशी कथा आहे. डाव देण्याच्या बाबतींत कांहीं लढा पडला असून शंकराच्या हातांत फांसे आहेत व पार्वती पुढें हात करून खेळूं देणार नाहीं, असें ह्मणत आहे असें मूर्तीकडे पाहिलें असतां वाटतें. खालच्या बाजूला शिवगणही आपापल्या नादांत गुंग आहेत. कोणी नंदीचें शेंपूट चावतो आहे तर कोणी त्याची तंगडी ओढितो आहे आणि एकजण तर दुसऱ्याच्या अंगावर मूत्रसिंचनही करीत आहे! शिवगणाचीं चित्रें बहुतेक बेढब कोरिलेलीं आहेत. एकमेकांच्या चेष्टा करणें अथवा नंदीच्या खोड्या करणें हाच त्यांचा नेहमींचा व्यवसाय अशा प्रकारच्या चित्रांतून दाखविला आहे.

पुढें भैरवाची मूर्ति असून तो सेवासूर व सोनासूर या दैत्यांचा वध करीत आहे, असें दाखविलें आहे. हें युद्ध सोलापुर जिल्ह्यांतील करमाळें तालुक्यांत सोनारी गांवाजवळ झालें, असें पुराणांत वर्णन आहे.

याच्या पुढें कैलासांतील नवरात्री नांवाच्या लेण्यांत जशा नऊ मूर्ति आहेत तशाच नऊ मूर्ति आहेत. सात स्त्रीमूर्ति, आठवा भैरव आणि नववा गणेश. या सर्व मूर्ति होम करण्याच्या तयारींत आहेत असें दाखविलें आहे. जवळच कोंपऱ्यांत ह्मणजे दाराच्या उजव्या बाजूस अगदीं रोडक्या अशा तीन पुरुषांच्या मूर्ति आहेत. त्यांपैकीं एकाचे हातांत विळ्यासारखें शस्त्र आहे व दोघे जण त्याची काकळुत करीत आहेत. वरच्या बाजूस एक पैशाची थैली हातांत असलेली मूर्ति आहे. यज्ञाला विघ्न करणाऱ्या राक्षसांच्या या मूर्ति असाव्या, किंवा यज्ञासाठीं कोणी तरी बळी पाहिजे तो मिळविण्याकरितां यज्ञ करणाऱ्यांनीं द्रव्याची पिशवी देऊन आपल्या दूतांस पाठविलें असावें व तो या दरिद्री माणसाकडे आला असावा. अशा वेळीं त्याचीं बायकामुलें त्याच्या हातांत विळा देऊन तूं आपल्या हातानें आमचा प्राण घे पण होमाला बळी देऊं नको अशी विनवणी करीत असावीं. ज्या वेळीं माणसांचा बळी देऊन यज्ञ करण्याची दुष्ट चाल प्रचारांत असेल त्या काळच्या स्थितीचें हें चित्र असावें. कदाचित् त्यावर आणखी कांहीं निराळी कल्पना बसवितां येण्याचा संभव आहे.

---

## नीलकंठ.

रामेश्वरापासून थोड्या उंचीवर नीलकंठ नांवाचें लेणें लागतें. समुद्रमंथन केलें, तेव्हां त्यांतून हालाहल नांवाचें विष निघालें. तें पृथ्वीस दग्ध करावयास लागलें तेव्हां शंकरानें तें प्राशन केलें. त्यामुळें त्याच्या कंठाला निळा डाग पडला आणि त्यावरून त्यास नीळकंठ हें नांव पडलें. अशी पौराणिक कथा आहे. या लेण्यांतील शिवलिंग फार सुरेख आणि कमनीय आहे. शाळुंका निळसर रंगाची असून कांहीं अंशीं पारदर्शक असल्यामुळें सुंदर दिसते. शाळुंकेंत पाहिलें असतां अंधुक प्रतिबिंब दिसतें. तींत पाहिलें असतां पुढील जन्म दृष्टीस पडतो असें सांगतात. आह्मां सर्वांस आमच्या स्वतःच्या मुखांशिवाय दुसरें कांहीं दिसलें नाहीं. तेव्हां निदान

पुढें जन्मास येणें भाग पडलेंच तर पुनः मनुष्यदेह प्राप्त होईल याबद्दल आह्मां सर्वांस समाधान वाटलें! औरंगजेबानें या ठिकाणीं आपलें तोंड पाहिलें असतां त्यास डुकर दिसलें ह्मणून त्यास संताप येऊन त्यानें लेण्यांची नासधूस केली, असें आमच्या वाटाड्यानें सांगितलें. लेणीं पाहण्यास हजारों लोक जातात, त्यांपैकीं ज्या कोणांस शाळुंकेंत भिन्न प्रतिबिंब दिसेल त्यांनीं आपला अनुभव अवश्य प्रसिद्ध करावा अशी आमची शिफारस आहे. या लेण्याला लागून दोन लहान लेणीं आहेत. त्या प्रत्येकांत एकेक लिंग आहे व येथें मूर्ति वगैरे खोदलेल्या नाहींत.

याच्यापुढें 'तेलिका घाणा' हें लेणें आहे. रावणाच्या खाईंत ज्याप्रमाणें जमिनीला एक भोंक आहे तसेंच येथेंही एक भोंक आहे. त्यावरून हें नांव त्यास देण्यांत आलें आहे. आंत शिवलिंग आहे. पुढच्या लेण्यास कुंभारवाडा ह्मणतात. येथेंही शिवलिंगच आहे. पण त्यास कुंभारवाडा कां ह्मणावें हें समजत नाहीं. नंतर दोन लेणीं लागतात, त्यांचें नांव जानोसा. जानोसा ह्मणजे लग्नाचें वऱ्हाड आलें असतां त्यास रहावयास दिलेली जागा हें उघड आहे. हीं दोन्ही लेणीं लहान असून खोलगट आहेत. दोन्हींतही शिवलिंगें आहेत.

येथून पुढच्या लेण्याला जावयास दोन मार्ग आहेत. एक चांगला व एक अवघड. चांगल्या वाटेनें जावयास पुनः मागें वळून बरेंच वांकडें घ्यावें लागतें. दुसऱ्या मार्गानें शेजारचें लेणें जवळ दिसतें. परंतु मार्ग बिकट आहे. स्थूळ देहाच्या माणसास त्या मार्गानें जाण्याचें धाडस करणें जिवावर येतें!

खालीं उतरण्यास निरुंद अशी पाऊलवाट आहे. तिनें जपून खालीं उतरलें असतां आपण एका लहान ओढ्यांत येतों. या ओढ्यांतून पुनः बरेंच चढावें लागतें. चढतांना वाट दिसत नाहीं. कारण गवत फार वाढलेलें असतें. या ओढ्यांत आह्मी उतरलों तेव्हां सूर्य कलला होता. त्यामुळें त्याचीं किरणें तिरपीं पडलेलीं होतीं. ओढ्यांत खालीं उभे राहून वर दृष्टि फेंकिली ह्मणजे डोंगर बराच उंच दिसतो. जानोसा आणि डुमाळ लेणें

या दोहोंच्या मध्यें डोंगराचा जो कोन आला आहे त्याच्यावरून खालीं या चिमुकल्या दरींत पाणी पडत असतें. त्यामुळें हा एक लहानसा धबधबाच बनला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पावसाळ्यांत पाणी जास्त पडत असावें. दिसेंबरअखेर हें पाणी फार कमी झालें होतें. या पाण्याचा व सूर्य-किरणांचा संयोग होऊन त्यामध्यें इंद्रधनुष्य पडलेलें दिसतें. हा देखावा मोठा चित्ताकर्षक भासतो. क्षणभर मोठ्या कौतुकानें व आनंदानें त्याजकडे पहात रहावें असें साहजिकपणें वाटतें. या स्वाभाविक सृष्टि-सौंदर्यापुढें मानवी कृति अगदीं निस्तेज असें दिसून येतें. ह्या लहानशा धबधब्याचें हिंवाळ्यांत जेव्हां पाणी कमी पडतें तेव्हां मध्येंच वाऱ्याची झुळूक येऊन तिच्या योगानें तें पाणी हाललें असतां एकंदरींत देखावा प्रेक्षणीय दिसतो. ह्या अनुपम सृष्टिसौंदर्याची हुबेहुब नक्कल कोणास तरी करितां येईल काय? सूर्यकिरणांच्या वक्रीभवनानें जें इंद्रधनुष्य या धबधब्यांत दिसतें त्याच्या रंगाप्रमाणें रंग उठवून त्याची मोहकता उत्पन्न करण्याची कोणाही उत्तम कल्पक शिल्पकाराची अथवा चित्रकाराची ताकद आहे काय? किंवा त्या रंगाचें परस्परामध्यें ज्या चतुराईनें मिश्रण केलेलें असतें ती चतुराई आपल्या आंगीं आहे, असें ह्मणणारा कोणी चितारी आहे काय? अकृत्रिमाची बरोबरी कृत्रिमानें होणें नाहीं व दोहोंची तुलना करणें हेंही वेडेपण आहे. सृष्टिसौंदर्याचा मोहपाश विलक्षण आहे. त्याला भुलून कित्येकांनीं अरण्यवास पत्करला, संसार तुच्छ मानिला व सृष्टिसौंदर्यांतच ते रममाण होऊन राहिले. आपणांस तसें कर्तव्य नाहीं. अथवा तसें करण्याची आपली तयारीही नाहीं. ह्मणून धबधब्यावरची दृष्टि काढून आपण आतां डोंगर चढूं. डोंगर चढतांना फार सावधगिरी बाळगावी लागते. जेथें आधार सांपडेल तेथें अगोदर हातानें वरच्या बाजूस धरून मग खालचा पाय उचलावा. इतकी सावधगिरी ठेवूनही कदाचित् पाय घसरून हाताचा आधार निसटण्याचा व तोंडघशी पडण्याची पाळी येण्याचा संभव असतो. अशा प्रसंगीं प्रसंगावधान राखून जर आंग तोलून धरिलें नाहीं तर खालीं गडगडत

जाण्याची फजिती सोसावी लागते. हा डोंगर चढतांना, मनुष्यानें ईश्वरापाशीं आपल्यास जर जावयाचें आहे तर तेथें जाण्याचा मार्ग मोठा बिकट आहे व तो मोठ्या दक्षतेनें व एकाग्रबुद्धीनें चढून गेलों तरच साध्य होण्याची आशा आहे, हा जो धडा आपण शिकतों, तो सर्वदा लक्ष्यांत बाळगण्यासारखा आहे.

---

## डुमाळ लेणें.

इतक्या महत्प्रयासानें डोंगर चढून वर आल्यावर थोड्या पायऱ्या लागतात. त्या चढून एका खिडकीवाटे आपण डुमाळ लेण्यांत शिरतों. डुमाळ लेणें ह्मणजे विवाहमंदिर. या लेण्यांत एके ठिकाणीं शिवपार्वतींच्या लग्नसमारंभाचा देखावा आहे, त्यावरून त्यास डुमाळ लेणें नांव मिळालें आहे. या लेण्याच्या मध्यभागीं शिवलिंग आहे. गाभारा चौकोनी असून त्याला चारी बाजूंस चार मोठाले दरवाजे आहेत. त्यामुळें लिंगावर भरपूर प्रकाश आहे. प्रत्येक दरवाजाच्या दोन्ही बाजूंस चौदा पंधरा फूट उंचीच्या द्वारपाळांच्या जंगी मूर्ति आहेत. ह्या जयविजयांच्या मूर्ति असाव्या. इतक्या मोठ्या मूर्ति वेरूळच्या लेण्यांत दुसरीकडे कोठेंही नाहींत. त्यामुळें त्या भेसूर आणि अक्राळविक्राळ दिसतात. एवढ्या जंगी मूर्ति पाहण्याची डोळ्यांस संवय नसल्यामुळें त्यांचें विशाळत्व दृष्टीस मोहक होत नाहीं हें उघड आहे. या जंगी मूर्ति अवलोकन करून लहान मुलें भीतीनें गांगरून जात असतील, यांत बिलकुल संशय नाहीं.

हें लेणें फार मोठें आहे. ह्मणजे एका धाब्याखालीं इतकें विस्तृत लेणें सर्व वेरूळच्या लेण्यांत एवढेंच आहे. हें त्याच्या लांबी रुंदीवरून तेव्हांच लक्ष्यांत येतें. त्याची लांबी १८५ फूट असून रुंदी १५० फूट आहे, यावरून त्याच्या मोठेपणाची कल्पना सहज होणार आहे. लांबीरुंदीच्या मानानें उंचीही त्याला शोभेल अशीच ह्मणजे १९ फूट आहे. या लेण्याला अठ्ठावीस जंगी खांब असून गाभाऱ्यासमोर सभामंडपा-

सारखा भाग असून त्याच्या दोन्ही बाजूंस तीन तीन पडव्या किंवा सोपे आहेत.

पश्चिमेकडील दरवाजाच्या डाव्या हातास वीरभद्राची मूर्ति आहे. वीरभद्र गजासुर आणि रत्नासुर दैत्यांचा वध करीत आहे. दक्षराजास तंगडीनें वर उचलून धरिलें असून पार्वती समोर बसली आहे. तुझा अपमान केल्याबद्दल मी याला शासन करीत आहें असें आविर्भावयुक्त वीरभद्र तिला दाखवित आहे. वीरभद्राच्या समोर शिवपार्वती कैलासांत बसलीं असून रावण कैलास उपटूं पाहत आहे. रावणानें कैलास उपटून नेण्याविषयींच्या कथेचा परिणाम शिल्पकारांच्या मनावर कदाचित् विशेष झालेला असेल आणि ह्मणूनच त्यांनीं अशा प्रकारचें चित्र ठिकठिकाणीं खोदिलें आहे. पुढें कोंपऱ्यांत, शिव, पार्वती, ब्रह्मा आणि गरुडावर आरूढ झालेला विष्णु इतक्या मूर्ति आहेत. या मूर्तींच्याच बाजूला एक अस्थिपंजर उरलेली सुरेख मूर्ति खोदलेली आहे. एके ठिकाणीं एक टोलेजंग स्त्रीमूर्ति खोदलेली असून तिच्या भोंवतीं सात मुलें आहेत. या भोळ्या बाईस मुलें कशीं झालीं हें तिला माहित नाहीं, ह्मणून तिला वेरूळची भोळी ह्मणतात, असें सांगण्यांत येतें. ज्या मूर्तींविषयीं यथार्थ माहिती सांगतां येत नाहीं त्यांना कांहीं मनःकल्पित नांवें देऊन वाटेल तशी अप्रयोजक माहिती सांगण्याच्या पडलेल्या प्रघाताचा हा एक मासला आहे. कोंपऱ्यांत यमधर्माची मूर्ति आहे. या लेण्यांत दोन सिंह कोरलेले आहेत ते चांगले साधले आहेत.

या लेण्याच्या दक्षिण भागाचा डोंगर अगदीं कड्यासारखा आहे. ह्याच कड्यावरून वर निर्दिष्ट केलेला सुंदर धबधबा खालीं पडत आहे. वरून पाणी जिकडून येतें तिकडे सरासरी अर्ध्या मैलाच्या अंतरावर एक लहानसें देवीचें देऊळ आहे. तेथें दरसाल एक जत्रा भरत असते.

---

## आदिनाथसभा.

कैलासापासून येथवर जितकीं लेणीं लागलीं तीं सर्व शिवालयें आहेत. येथून पुढें पुनः बौद्धांचीं अगर जैनांचीं लेणीं लागतात. आदिनाथ-सभा ह्या लेण्याची जागा बाहेरून मुळींच दर्शनीय वाटत नाहीं. लेण्यांत मध्यभागीं बौद्धांच्या लेण्यांत आपण पाहिलेल्या बुद्धाच्या मूर्ती-प्रमाणें मूर्ति आहे. बाह्यस्वरूपावरून हें लेणें पाहण्यासारखें नाहीं असें समजून तें वगळावें, असें येथवर एकसारखें लेणीं पाहत आल्यावर वाटण्याचा संभव आहे. तसें केल्यास फसल्यासारखें होईल. लेण्याचें आंतील काम सुरेख आहे. हें लेणें पूर्वीं मातीनें भरून गेलें होतें असें ह्मणतात. हल्लीं तें खुलें करण्यांत आलें असून चांगल्या स्थितींत आहे. पण एक वेळ मातीनें तें भरून गेलें असल्यामुळें त्याला दिलेला रंग नाहींसा झालेला आहे. खांबांवर नकशी काम विशेष कुशलतेनें खोदलें असून त्यांचा घाट इतर खांबांहून भिन्न पण सुंदर आहे. खांबांच्या मध्यें कमानी कोरलेल्या आहेत. कमानींत आणि खांबांच्या नकशी कामांत अगदीं तंतोतंत साम्य उतरलें आहे. मूर्तींवर कोरलेलीं फुलें खरोखरच सुंदर आणि प्रेक्षणीय आहेत.

---

## आदिनाथ.

आदिनाथसभेंतून पंधरा पायऱ्या चढून गेलें ह्मणजे हें लेणें लागतें. तें बरेंच प्रशस्त आहे. आंतमध्यें कोरलेल्या सर्व मूर्ति बुद्धाच्या असाव्या. कारण ह्या सर्व मूर्ति निरनिराळीं आसनें घालून ध्यानस्थ बसल्याचें दाखविलें आहे. पहिल्या मजल्यासारखीच येथील खांबांवरची नकशी सुरेख आहे. खालच्या मजल्यापेक्षां या मजल्याची उंची जास्त आहे. मध्यभागीं बुद्धाची मूर्ति आहे. या लेण्याच्या नजिकच एक सुंदर लेणें व कैलासाच्या धर्तीवर कोरलेलें लहानसें देऊळ मातीनें बुजून गेलें आहे असें ह्मणतात. असें खरोखर झालें असल्यास मोठी दुःखाची गोष्ट होय. अलीकडे

आमच्या देशांतील जुन्या इमारतींचा उद्धार बराच झाला आहे. त्या सुस्थितींत ठेवणें सरकारचें व लोकांचें कर्तव्य आहे असें जाणून त्यांच्या संरक्षणार्थ सरकारानें कायदाही केला आहे. सरकारच्या या कृत्यानें तें पुष्कळांच्या आदरास पात्र झालें आहे, ही गोष्ट त्यांस भूषणास्पद आहे. वेरूळचीं लेणीं निजामसाहेबांच्या हद्दींत असल्यामुळें कांहीं लेणीं बुजून गेलीं असलीं तर तीं उकरून काढविण्याची आपल्या अधिकाऱ्यांकडून तजवीज करणें योग्य आणि अवश्य आहे, अशी आमची निजामसरकारांस नम्रतापूर्वक सूचना आहे. तिजकडे त्यांचें लक्ष्य जाईल अशी आह्मांस आशा आहे.

---

## पारसनाथ.

हें लेणें फारसें मोठें नाहीं. याला लागूनच जगरनाथ आणि इंद्रसभा हीं लेणीं आहेत. पारसनाथाच्या लेण्याला सोळा खांब आहेत. मध्यभागीं गाभाऱ्यांत मांडी घालून बसलेली मूर्ति आहे. ती बुद्धांच्या इतर मूर्तीप्रमाणेंच हुबेहुब आहे. परंतु जैनांनीं तिला पारसनाथ हें नांव दिलेलें आहे. वेरूळचे लोक या मूर्तीस रणछोड ह्मणतात. द्वारकेंत श्रीकृष्णाची जी मूर्ति आहे तीस रणछोड हें नांव गुजराथी लोकांनीं दिलें आहे. तेव्हां गुजराथ्यांनींच या मूर्तीसही तेंच नांव दिलें असावें हें उघड आहे. या लेण्यांत ज्या देवळ्या अगर कोनाडे आहेत त्या सर्वांमध्यें, कांहींत बसलेल्या व कांहींत उभ्या, अशा बुद्धाच्या मूर्तींप्रमाणें मूर्ति आहेत. गाभाऱ्याच्या डाव्या बाजूस उभी आणि नग्न अशी एक मूर्ति आहे. तिच्या दोन्ही बाजूंस स्त्रीमूर्ति आहेत. एक माणूस जणों काय प्रार्थना करीत त्या मूर्तीच्या पायांशीं बसला आहे आणि त्याच्या भोंवतालीं मेंढ्या, उंदीर, सर्प आणि विंचू खुशाल वावरताहेत असा देखावा खोदला आहे. याचा संबंध जैनांच्या मुख्य धर्ममतांशीं असावा. मेंढ्यासारखीं अगदीं निरुपद्रवी जनावरें असोत, अथवा विंचू आणि सर्प यांसारखे विषारी प्राणी असोत, त्यांच्या आत्म्यांला त्रास द्यावयाचा नाहीं, त्यांना यत्किंचित्‌ही पीडा

करावयाची नाहीं, अशा "अहिंसा परमो धर्मः" या तत्वाच्या दाखल्यानें उपदेश ठसविण्याकरितां हा वस्तुपाठाचा धडा मिळावा, असा हेतु, खोदणाऱ्या शिल्पकारांचा असावा. जैनांच्या धर्मग्रंथांत या चित्राला धरून एखादी कथा असल्यास या देखाव्याचा खरा खरा उद्देश जास्त स्पष्ट रीतीनें समजण्याचा संभव आहे.

गाभाऱ्याला जें दार आहे, त्यावर स्त्रीपुरुषांचीं बारीक बारीक चित्रें खोदून तें फार सुशोभित केलें आहे. गाभाऱ्यांतील मुख्य मूर्तीची पूजा केली असतां तीर्थ बाहेर जाण्यास ज्याप्रमाणें हिंदूंच्या देवळांतून मार्ग असतो, तसा येथें आहे. जैनांमध्यें मूर्तिपूजेचा प्रसार आहे. जैन आणि हिंदु धर्ममतें अनेक शतकांपासून या देशांत प्रचलित आहेत. तेव्हां परस्परांवर परस्परांच्या मतांचे इष्ट अथवा अनिष्ट परिणाम घडले असल्यास नवल नाहीं. पुढच्या पडवीच्या शेवटीं इंद्र आणि इंद्राणी अशा दोन मूर्ति हत्तीवर आणि वाघावर अनुक्रमें बसलेल्या आहेत. प्रत्येक मूर्तीच्या मस्तकावर वृक्षच्छाया असून त्यावर पक्षी बसलेला दाखविला आहे. तें कशास उद्देशून आहे किंवा कशाचें निदर्शक आहे याचा उलगडा एखाद्या पौराणिक कथेच्या आधाराशिवाय होणार नाहीं.

---

## जगरनाथसभा.

जगरनाथसभेंत जाण्यास पारसनाथ लेण्यांतूनच वाट आहे. या लेण्याच्या मध्यभागीं जी मूर्ति आहे, तिला कोणी जगरनाथ अथवा जगरनाथबुद्ध ह्मणतात, व कोणी परशुराम ह्मणतात. ही मूर्ति पुढें डोंगरावर असलेल्या पारसनाथाच्या मूर्तीप्रमाणें हुबेहुब आहे. बुद्धांच्या आणि जैनांच्या लेण्यांत ज्या तऱ्हेच्या मूर्ति खोदिल्या आहेत त्यांवरून दोहोंमध्यें बरेंच सादृश्य आहे, हें सहज लक्ष्यांत आल्यावांचून राहत नाहीं. त्यावरून मूर्ति किती सुरेख खोदिल्या आहेत, याविषयीं सहज अटकळ बांधितां येईल. या लेण्यांत भवानीची ह्मणजे भागीरथी भवानी हें नांव जिला

दिलें आहे, तिची मूर्ति दोन ठिकाणीं आहे. एके ठिकाणीं तिच्या हातांत आरसा, फुलें वगैरे आहेत, व दुसऱ्या ठिकाणीं तिच्या बाजूस वाघ आहे.

या लेण्याच्या सभामंडपाच्या मध्यभागीं जमिनीवर तीन वर्तुलें समांतर खोदलेलीं आहेत. ज्योतिःशास्त्राशीं त्यांचा कांहीं तरी संबंध असावा असें कांहीं शोधकांचें ह्मणणें आहे. खोदणाऱ्यांचा काय उद्देश असेल हें नक्की सांगतां येणें कठीण आहे.

गाभाऱ्याच्या उजव्या बाजूला एका मोठ्या देवळींत एक उभी मूर्ति खोदिली असून तिच्या भोंवतीं लहान लहान मूर्ति आहेत. या उभ्या मूर्तीच्या डाव्या हातास वाघावर बसलेली एक मूर्ति आहे. मध्यभागीं उभ्या असलेल्या नग्न मूर्तीच्या पायापासून निघालेली एका सर्पाची आकृति आहे. त्या सर्पाच्या वेंटाळ्याला टेंकून ही मूर्ति उभी आहे. खालच्या बाजूस दोन लहान मूर्ति हात जोडून बसल्या आहेत. कांहीं बारीक बारीक मूर्ति वरच्या बाजूस जणों काय हवेंत तरंगताहेत असें दिसतें. एका मूर्तीनें वर छत्रीसारखें दिसणारें एक आच्छादन धरिलें आहे. ब्राह्मण या मूर्तीला शेषशायी ह्मणतात. परंतु शेषशायी भगवान् नेहमीं शेषावर निजलेले असून त्यांच्या नाभिकमलांतून ब्रह्मदेव निघालेला असतो, ही गोष्ट ते विसरतात.

कैलासांत उभें राहिलें असतां त्याचा एकंदरींत भव्य आकार पाहून मन जसें थक्क होतें, तसा प्रकार या लेण्यांत होत नाहीं. साधारणपणें अशी स्थिति होते कीं, कैलासाचा अवाढव्यपणा पाहून पाहणारा किंचिदंशीं भयभीत होऊन येथें उभें न राहतां निघून जावें असेंही त्यास वाटावयास लागतें. ज्यानें असलीं कामें कधीं पाहिलीं नाहींत अशा अगदीं गांवढळ माणसास तेथें दहा मिनिटें शांत मनानें उभें राहवेल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. परंतु जगरनाथासारख्या ठिकाणीं तसें होत नाहीं. येथें मनास आनंद होऊन विश्रांति घेत व सभोंवतीं अवलोकन करीत बसावें असें वाटतें. सर्वसंग-परित्याग करून एकांतवासांत ध्यानस्थ रीतीनें आत्मानंदाचा अनुभव घेत

येथेंच आपलें आयुष्य कंठावें, दुःखमय संसाराची येथें बाधा होण्याचा संभव नाहीं, अप्रामाणिक, कपटी, निर्दय आणि असत्यप्रिय माणसांच्या कुसंगतीचा वारा येथें लागणार नाहीं अथवा कृतघ्न माणसांचें काळें तोंड पाहण्याची पाळी येथें येणार नाहीं, असें सात्विक वृत्तीच्या माणसास वाटणें साहजिक आहे. सिसरोनें एके ठिकाणीं ह्मटल्याप्रमाणें अशीं स्थळें शांततेंत, आणि सद्वर्तनानें राहून ईश्वरचिंतनांत काळ घालविण्यास अगदीं योग्य आहेत. खरोखर पाहिलें असतां अभ्यासाला अथवा गहन विचाराला हींच स्थळें लायक होत. अशाच एकांत स्थळीं आमच्या प्राचीन ऋषिवर्यांनीं वास्तव्य करून गहन विषयांचा अभ्यास केला असला पाहिजे. खरोखर अशीं रम्य स्थळें पाहिलीं ह्मणजे आपल्या आवडत्या विषयाचीं पुस्तकें घेऊन येथें येऊन राहावें आणि अभ्यासांत मग्न व्हावें असें वाटतें. अशा रीतीनें काल-क्रमणा केल्यास भगवान् श्रीकृष्णाच्या 'स शांतिमधिगच्छति' या वाक्यास खरोखर सत्यता आल्याशिवाय राहणार नाहीं. मनाला खरी शांति जगांत एकसारखें वावरून मिळत नाहीं. लोकांमध्यें एकसारखा वावरणारा माणूस देखील दहा पांच मिनिटांच्या एकांताचा अभिलाष करीत असतो, असें आपणांस रोजच्या व्यवहारांत दिसून येतें. या लेण्यासारख्या ठिकाणीं रहावयास मिळण्यास मोठें भाग्य पाहिजे. तें संसारपाशांनीं बद्ध झालेल्या पामरांस कधींही लाधावयाचें नाहीं. एकनाथ महाराजांचें एक ओवीबद्ध चरित्र आहे, त्यांत देवगडापासून जवळच डोंगरांत जाऊन एकांतवासांत एकनाथ राहिल्याचा उल्लेख आहे. कदाचित् एकनाथ येथेंच येऊन राहिले असावेत.

या लेण्यासंबंधानें अशी एक गोष्ट सांगतात कीं, अवरंगजेब बादशहानें हें दारूनें उडवून देण्याचा प्रयत्न केला. परंतु, तें त्याच्या मनाप्रमाणें झालें नाहीं, ह्मणून त्यानें असेच दुसरे कांहीं प्रकार केले. परंतु या बाबतींत एकवाक्यता नसल्यामुळें निश्चयात्मक कांहीं सांगता येत नाहीं. औरंगाबाद हें शहर अवरंगजेबानें आपली दक्षिणेंतील राजधानी केलें होतें. कांहीं मुसलमान राजे हिंदूंस फार त्रास देत असत ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे.

या कामीं अवरंगजेबानें तर पूर्ण कीर्ति संपादन केली होती याबद्दल इतिहास साक्ष देतो. तेव्हां त्याच्या हातून वर नमूद केलेलें कृत्य घडलें असल्यास विशेष आश्चर्य नाहीं. पूर्वीचे मुसलमान राजे धर्माच्या कामीं फार आग्रही असत. ते फार ऐषआरामी असत. आणि लोकांत काय होत असे त्याकडे त्यांचें लक्ष नसे. असें कांहीं इतिहासकार ह्मणतात. या शेऱ्यास थोर आणि उदार मनाचा अकबरासारखा एकादा बादशहा अपवाद असावयाचाच. अवरंगजेबानें आपल्या हिंदुप्रजेवर अत्यंत जुलूम केला त्यामुळें सर्व हिंदु प्रजा अत्यंत असंतुष्ट झाली. शेवटीं इतक्या थरावर गोष्ट येऊन पोंचली कीं, राजा यशवंतसिंगासारख्या मोगल पातशहाच्या एकनिष्ठ आणि राजनिष्ठ नोकरास अवरंगजेबाची कानउघाडणी करणें भाग पडलें. ती करण्यांत त्यानें जो स्पष्टवक्तेपणा दाखविला त्याबद्दल त्याची खरोखर तारीफच केली पाहिजे. यशवंतसिंगानें अवरंगजेबास पाठविलेल्या पत्राचा सारांश येथें दिल्यानें जरी विषयांतर केल्याचा आरोप येण्याची भीति आहे, तरी केवळ विषयानुरोधानें आलेला प्रसंग टाळितां येत नाहीं.

" सार्वभौम बादशहा ! अकबरानें आपल्या प्रजेस कसें वागविलें याची थोडी आठवण करा. त्यानें आपल्या समदृष्टीनें हिंदु पंडितांकडून स्वतःस ' जगद्गुरु ' ही पदवी मिळविली होती. त्याप्रमाणेंच जहांगीर आणि शहाजहान यांनींही कीर्ति मिळविली, ते राज्य करीत असतां सर्व राज्याची एकसारखी भरभराट होती.

"अहो अवरंगजेब बादशहा ! आपण राज्य करावयास लागल्यापासून अनेकांचीं मनें असंतुष्ट झालीं आहेत, व प्रजाजनांपैकीं पुष्कळ लोक तक्ताचे शत्रु बनले आहेत. राज्यविस्तार कमी कमी होत चालला आहे. एकामागून एक प्रांत शत्रु सर करीत असल्यामुळें दिवसेंदिवस राज्य अधिक संपुष्टांत येईल हें उघड आहे.

" दुर्दशेंत असलेल्या प्रजेपासून वाटेल तसे कर वसूल करण्यांत जो राजा आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करितो, त्याचें वैभव कायम कसें

रहावें ? पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सर्व हिंदुस्थानभर अशी बोलवा आहे कीं, ब्राह्मण, जोगी, गरीब हिंदु पुजारी वगैरेपासून पैसे वसूल करण्याची बादशहास लालसा उत्पन्न झाली आहे. परमेश्वरानें दिलेले ह्मणून जे ग्रंथ मानिले आहेत, त्यांवर जर आपला भरंवसा असला, तर त्यांत आपणांस खात्रीनें आढळून येईल कीं, ईश्वर हा फक्त मुसलमानांचा नसून सर्व मानवजातीचा ईश्वर आहे. मुसलमानांप्रमाणें इतरांसही त्याजपुढें उभें रहाण्याचा हक्क आहे. दुसऱ्यांच्या धर्माचा उपहास करणें आणि त्यांच्या रीतीभातींत कुत्सितबुद्धीनें ढवळाढवळ करणें ह्मणजे ईश्वरास प्रसन्न करून घेण्याचे कामीं आपण अगदीं बेफिकीर आहों असें दाखविण्यासारखें आहे. जेव्हां एखादें सुंदर चित्र आपण विद्रूप करितों, तेव्हां चित्रकाराच्या तिरस्कारास आपण साहजिकपणें पात्र होतों हें उघड आहे.

शेवटीं आपणांस एवढेंच सांगावयाचें आहे कीं, राज्यपदास शोभेल अशी राजनीति आपणांस सांगण्याच्या कामीं आपल्या मंत्र्यांनीं कसूर केली आहे, याबद्दल फार आश्चर्य वाटतें."

---

## इंद्रसभा.

इंद्रसभा हें उत्तरेकडील अगदीं शेवटचें लेणें आहे. जगरनाथ सभेतून इंद्रसभेंत येण्यास एक अरुंद वाट आहे. या लेण्यांतील पडवींत एके ठिकाणीं इंद्राची मूर्ति आहे. त्यावरून लेण्यास हें नांव पडलें आहे. हें लेणें दक्षिणाभिमुख आहे. त्याची लांबी ६१ फूट असून ४८ फूट रुंदी आहे. छत गुळगुळीत असून त्याला सोळा खांब आहेत. सभामंडपाच्या छताला मध्यभागीं एक सुरेख फूल खोदलेलें आहे. मागील लेण्यांतील खांबांपेक्षां येथील खांबांवर चांगली नकशी आहे. ह्मणजे एकंदरींत सर्व लेण्यांतील खांबांपेक्षां या लेण्यांतील खांबांवर फारच छानदार नकशी खोदलेली आहे.

मध्यभागीं गाभारा असून त्यांत बुद्धाची मूर्ति आहे. ती मांडी घालून बसलेली आहे. लेण्यांत सभोंवार ध्यानस्थ बसलेल्या अशा व कांहीं खालीं

पाय सोडून बांकावर बसल्यासारख्या मूर्ति आहेत. मूर्तींच्या आंगांवर भूषणें वगैरे कांहीं नाहींत. पुढील पडवींत एक पुरुषाची मोठी मूर्ति असून ती एका हत्तीवर बसलेली आहे, व तिच्या मस्तकावर एका झाडाची छाया आहे, असें चित्र खोदलेलें आहे. या मूर्तीसच इंद्र असें ह्मणण्याचा प्रघात पडला आहे.

इंद्रसभेच्या पुढच्या बाजूस खडकांतूनच एक चौक कोरून काढलेला आहे. त्याच्या मध्यभागीं एक लहानसें देऊळ आहे, त्यास दौलताबाद असें ह्मणतात. हें नांव त्यास देण्याचें कारण कीं, त्याची आकृति दौलताबादच्या किल्ल्याप्रमाणें आहे. या चौकांतच एक दीपमाळीसारखा खांब आहे. तो डाव्या हातास आहे.

या बाजूच्या लेण्यांमध्यें सौंदर्य आणि आकार यांच्या मानानें इंद्रसभा हें सर्वांत उत्तम आहे. आणि खोदींव कामाच्या मानानें पाहिलें असतां तीन ताळ ह्या विशाळ लेण्यापेक्षां तें वरच्या पायरीचें असून सर्व दृष्टीनें विचार केला असतां वेरूळच्या सर्व लेण्यांत याची कोणी दुसरी प्रत लावतात तर कोणी एक पायरी खालीं उतरवितात. सर्व लेण्यांस ललामभूत अशा कैलासाशीं यांचें पुष्कळ साम्य आहे. फक्त फरक एवढाच आहे कीं, या लेण्याच्या मागच्या बाजूला ह्मणजे पूर्वेकडील बाजूला मोठीं दालनें आहेत. कैलासाच्या मागच्या बाजूस व दोन बाजूंस एकसारख्या अशा तीन खोदींव मूर्तींच्या ओवऱ्या आहेत पण येथें लागूनच दालनें आहेत. या ठिकाणचें काम जास्त कुशलतेचें आहे. हें लेणें कोरतांना कारागिरांनीं कैलासाचा नमुना डोळ्यांपुढें ठेवून त्यावर ताण करण्याचा निश्चय केला असावा असें येथें दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या कौशल्यावरून दिसून येतें. लेण्यासमोर पटांगणांत मध्यभागीं कैलासाच्या नमुन्यावर लहानसें देऊळ कोरण्याचा प्रयत्न झालेला आहे. याला वर चढण्यास जिने नाहींत अथवा वर दुसरा मजलाही नाहीं. हीं दोन वगळून हें चिमुकलें कैलासच इंद्रसभेपुढें उभें आहे. चिमुकलें ह्मणण्याचें कारण कैलास त्याच्या निदान १२०० पट मोठें आहे असें गणितशास्त्रज्ञांचें मत आहे. वर ज्या दीपमाळीचा उल्लेख आहे

तेथें उत्सवाच्या वेळीं लोक दिवे लावतात. कैलासाप्रमाणें येथेंही दोन स्तंभ होते, परंतु एक अवरंगजेबानें फोडून टाकला असें सांगतात.

इंद्रसभेपासून पाव मैलापेक्षांही कमी अंतरावर खडकांत खोदलेली एक भली जंगी बुद्धाची मूर्ति आहे. ती एका सिंहासनावर बसलेली आहे. ही मूर्ति दहा फूट उंच असून मांडी घालून बसलेली आहे. सिंहासनाला आधार ह्मणून खालीं हत्तीचीं व वाघाचीं मुंडकीं आहेत. डोक्यावर सातफण्याच्या नागानें छाया धरलेली आहे, व नागाच्या वेटाळ्यास टेंकून ही मूर्ति बसलेली आहे. ह्या मूर्तीच्या सान्निध्याला सहा मूर्ति असून त्या सर्व प्रधान मूर्तीची हात जोडून प्रार्थना करीत आहेत असें दाखविलें आहे. ह्या मूर्तीला पारसनाथ असें ह्मणतात.

सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं औरंगाबाद येथील नेमीदास नांवाच्या एका सराफानें या मूर्तीवर छाया केली व तेथें एक लेखही खोदून ठेविला. या ठिकाणीं पारसनाथाची यात्रा दरसाल भाद्रपद शुद्ध चतुर्थीस भरत असते.



# लेण्यांचें परस्परांशीं साम्य.

वेरूळच्या लेण्यांचे दोन मुख्य भेद केले पाहिजेत. एक हिंदु धर्मानुयायांच्या लेण्यांचा व दुसरा बौद्धानुयायांच्या लेण्यांचा. पहिल्या प्रकारचें लेणें ओळखण्याची मुख्य खूण ह्मटली ह्मणजे मध्यस्थानीं विराजमान असलेलें शिवलिंग. दुसऱ्या प्रकारच्या लेण्यांत मध्यभागीं प्रचंड अशी बुद्धाची मूर्ति ठळकपणें दृष्टीस पडते. स्वतः बुद्धानें मूर्तिपूजेचा निषेध केला. पण पुढें त्याच्या अनुयायांनीं त्याच्या मूर्ति खोदवून त्यांची आराधना करण्यास सुरवात केली ! तसेंच हिंदुलोकांत लिंगार्चनाचा विशेष प्रसार असून तेंच दैवत प्राधान्य होतें, असें अनुमान काढण्यास इतिहासदृष्ट्या आधार आहे. इतर देवांना मागाहून प्राधान्य मिळालें असावें. श्रीशंकराचार्यांचा जेव्हां अवतार झाला, तेव्हां प्रचारांत असलेल्या पांच सांप्रदायांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. त्यांत त्यांनींही शिवालाच वर्चस्व दिलें. सर्व लेण्यांतून महाभारतांतील अथवा रामायणांतील कथानकांचीं द्योतक अशीं चित्रें वस्तुतः फारच थोडीं आहेत. यावरून राम, कृष्ण, मुरलीधर, विठ्ठल, दत्तात्रय, हनुमान् इत्यादिकांचीं देवळें बरींच अर्वाचीन काळीं अस्तित्वांत आलीं असावीं असें एक अनुमान निघतें. त्याबरोबरच, ह्या पौराणिक विभूतींच्या उपासनेचा प्रकार रूढ होण्यापूर्वीं हीं लेणीं अस्तित्वांत आलीं असावीं, असेंही दुसरें अनुमान काढितां येण्यासारखें आहे. अथवा लेणीं खोदविणारे केवळ शिवोपासक असून त्यांनीं इतर देवतांचीं चित्रें लेण्यांत खोदिलीं जाणार नाहींत, अशी खबरदारी घेतली असण्याचा संभव आहे ! निश्चितपणें कोणतीही गोष्ट ठरविण्याचें काम इतिहासकारांचें अथवा प्राचीन शास्त्रवेत्त्यांचें आहे. तथापि, शिवोपासना त्या काळीं विशेष प्रचलित होती, असें निश्चित अनुमान काढल्यास कांहीं बाध येईल असें वाटत नाहीं. तेव्हां त्याबद्दल ज्यास्त वाटाघाट न करितां एकंदर लेणीं पाहून सर्वसाधारण अशा काय काय गोष्टी नजरेस येतात, याचें थोडक्यांत दिग्दर्शन करण्याचा पुढील प्रयत्न आहे.

प्रत्येक गाभाऱ्याच्या बाहेर त्याच्या द्वाराच्या दोहों बाजूंस धिप्पाड द्वारपाळ उभे असलेले दिसतात. मोठमोठ्या श्रीमंतांच्या घरीं त्यांच्या भेटीस जावयाचें असल्यास अगोदर देवडीवाल्याकडून वर्दी पोंचवावी लागते. साहेब लोकांकडे भेटीस जावयाचें असल्यास 'भेटीचें कार्ड' पाठवावें लागतें. राजेरजवाडे अगर त्यांच्या तोडीचे इंग्रजींतील अंमलदार यांजकडे खाजगी कारभारी ऊर्फ 'प्रायव्हेट सेक्रेटरी' मार्फत परवानगी मिळवावी लागते. मनुष्यांमध्यें श्रेष्ठ ह्मणवून घेणाऱ्यांमध्यें हा प्रघात फार प्राचीन काळापासून असावा. आपल्यावरून जग ओळखावें, या न्यायानें मनुष्यानें निर्माण केलेल्या कृतींत त्याच्या वृत्तीचें प्रतिबिंब उठावें हेंही पण साहजिक आहे. भूपति ह्मणविणारांच्या द्वारीं जर द्वारपाळांचा कडेकोट बंदोबस्त, तर भूपतींचा जो पति त्याच्या द्वारीं त्यांची वाण काय ह्मणून ? सर्व द्वारपाळांच्या मूर्तींमध्यें विश्वकर्म्याच्या शेजारच्या ह्मणजे धेडवाड्याच्या लेण्यांतील द्वारपाळांचीं शिरस्त्राणें फार चांगलीं आहेत. हें शिरस्त्राण मोंगली टोपीसारखें उंच, परंतु वर वर्तुलाकार आहे. त्यांत मांडी घालून बसलेली एक मूर्ति खोदलेली आहे. आणि दुसऱ्या द्वारपालांच्या शिरस्त्राणाच्या मध्यभागीं एक अर्ध-वर्तुलाकार आकृति आहे. त्याचा लेण्यांतील मुख्य मूर्तीशीं कांहीं तरी संबंध असला पाहिजे अथवा अशी आकृति शिरोभागीं दाखविण्यांत निदान कांहीं तरी गूढार्थ असला पाहिजे यांत संशय नाहीं. एखादा ब्रह्मविद्येचा अभ्यास करणारा जिज्ञासु लेण्यांचें परीक्षण करून साधारण लोकांस गूढ अशा गोष्टींचा उलगडा करण्याची खटपट करील, तर अगम्य अशा प्रदेशांत संचार करण्यास मार्ग दाखविल्याचें श्रेय तो सहज संपादन करील. बुद्धाच्या द्वारपाळांच्या शरीरावर बौद्धमतास अनुसरून अशीं विशिष्ट चिन्हें दृष्टोत्पत्तीस येतात असेंच केवळ नव्हे. द्वारपाळाशिवाय वारंवार ठिकठिकाणीं दृष्टो-त्पत्तीस येणाऱ्या मूर्ति ह्मटल्या ह्मणजे ज्यांना नवग्रह ह्मणतात त्या होत.

हीं लेणीं एकदां चुन्याचा गिलावा करून रंगविलेलीं होतीं अशाविषयीं लेण्यांत फिरत असतां ठिकठिकाणीं साक्ष पटते. लेणीं कोरल्यानंतर बऱ्याच काळानें रंगाचें काम झालें असावें असें शोधकांचें मत आहे. कांहीं ठिकाणीं

चुन्याच्या गिलाव्यामुळें मूर्तींची पहिली शोभा व सौंदर्य कमी होऊन तिला ओबडधोबड स्वरूप प्राप्त झालें आहे. कांहीं युरोपियन प्रवाशांनीं मूर्तींवरील गिलाव्याचे धलपे पाडून टाकून मूर्तींच्या मूळच्या जास्त सौंदर्याबद्दल आपली खात्री करून घेतल्याचें आपल्या प्रवासवृत्तांत व लेण्यांच्या वर्णनांत नमूद करून ठेविलें आहे.* चुन्याच्या गिलाव्याचें व रंगाचें काम केव्हां झालें असावें याबद्दल नक्की माहिती नाहीं. त्याबद्दल अनुमान करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. राजा येलूनें हें काम करविलें होतें, असें वेरूळच्या ब्राह्मणांच्या मुखीं आहे. हा राजा हजारों वर्षांपूर्वीं होऊन गेला अशी लोकसमजूत आहे, हें घृष्णेश्वरच्या तीर्थासंबंधीं माहिती देतांना नमूद केलें आहेच. कांहींचें असें मत आहे कीं, यादव कुलांतील जे राजे देवगडास राज्य करीत होते, त्यांपैकीं एखाद्या राजानें हें रंग देण्याचें काम करविलें असावें. यावरून एवढें दिसतें कीं तें निदान सहाशें वर्षांपूर्वीं झालें असलें पाहिजे.

कांहीं लेणीं मातीनें बहुतेक बुजून गेलीं होतीं. तीं बुद्ध्या कोणीं बुजविलीं असावींत असें मानण्याचें कारण नाहीं. दक्षिणेंत स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानांनीं हिंदूंच्या मूर्ती फोडल्या, देवळाच्या मशिदी केल्या असे त्यांजवर साधार आरोप आहेत. अफगाणिस्थानांतील कांहीं लेणीं मुसलमानांनीं अगदीं बुजवून टाकल्याचें युरोपियन प्रवाशांच्या नजरेस आलें आहे. इकडेही कदाचित् तसें झालें असल्यास विशेष आश्चर्य नव्हे. कदाचित् केवळ कालवशात् हीं लेणीं मातीनें बुजून गेलीं असावीं, असें होण्याचाही संभव आहे. असें होण्यास किती वर्षें लागणें शक्य आहे हें मात्र प्राचीन वस्तुशास्त्रवेत्ते सांगूं शकतील, व त्यावरून लेण्यांच्या रंगांची मिती ठरविण्यास ठीक पडेल. एवढें खात्रीनें ह्मटलें पाहिजे कीं, मातीनें बुजून जाण्यापूर्वीं लेण्यांस रंग दिलेला होता, यांत संदेह नाहीं.

लेण्याला नुसतें रंग देण्याचें काम ह्मटलें तरी विलक्षण मेहनतीचें, कुशलतेचें व कालावधीचें आहे. तें करण्यास लेण्याच्या आसमंताद्भागीं सर्वत्र

---

* मुंबई येथील लिटररी सोसायटीचा रिपोर्ट व्हाल्युम ३.

शांतता नांदत असून त्या वेळीं कोणी तरी बलाढ्य हिंदुराजा राज्य करीत असला पाहिजे. दक्षिणेंत मोंगलांचा अंमल बसण्यापूर्वीं दौलताबाद अगर देवगड येथें हिंदुराजे राज्य करीत होते. ज्ञानेश्वराच्या वेळीं त्या ठिकाणीं रामचंद्रराव नांवाचा यादवकुलांत उत्पन्न झालेला राजा राज्य करीत होता, हें "तेथें यदुवंशविलासु । जो सकलकलानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥" या ज्ञानेश्वरींतील ओंवीवरून उघड आहे. ज्ञानेश्वराच्या वेळीं मुसलमानांनीं दक्षिणेवर स्वारी केली नव्हती. मुसलमानांनीं दक्षिणेंत स्वारी करून देवगडच्या राजाचा पराभव इ. स. १२९३ मध्यें केला. त्यानंतर दक्षिणेंत स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानांसारख्या कडव्या मूर्तिभंजकांनीं लेण्यांस रंग देण्याचें काम एखाद्या हिंदु राजास करूं दिलें असेल, किंवा मुसलमानांच्या स्वाऱ्या होत असतां कोणीं केलें असेल, असें संभवत नाहीं. रंगाचें काम कोणातरी हिंदु राजानेंच केलें असावें, बौद्धांनीं केलें नसावें, असें ह्मणण्यासही एक विशेष कारण आहे. तें हें कीं, जर बौद्धानुयायांचें हें कृत्य असतें तर विश्वकर्म्यासारख्या भव्य आणि सुंदर लेण्यास रंग देऊन तें शोभिवंत करण्याचें काम त्यांनीं प्रथम केलें असतें; परंतु या लेण्यास रंग बिलकूल लावलेला नाहीं. आणि ज्या अर्थीं हिंदूंच्या लेण्यांबरोबर बौद्धांच्या कांहीं लेण्यांसही रंग लावलेला आहे, त्या अर्थीं ज्या वेळीं रंग देण्याचें काम झालें तेव्हां वैदिक धर्मानुयायांची बौद्ध लोकांविषयीं तिरस्कारबुद्धि नष्ट झाली असावी.

लेण्यांत पुष्कळ बाबतींत एक प्रकारचें साम्य दिसून येतें. त्याचा ठळकपणें उल्लेख करणें जरूर आहे. बहुतेक सर्व लेणीं चतुष्कोणाकृति आहेत, लेण्यांतील खांबांच्या रांगा समांतर असून कांहीं ठिकाणीं मध्यभागीं खांबांत जास्त अंतर सोडण्यांत आलें आहे, त्यामुळें मध्यभागीं विस्तृत सभामंडप बनलेले आहेत. प्रत्येक लेण्यास आंतल्या बाजूस मध्यभागीं गाभारा असून त्यांत शिवलिंग अथवा बुद्धाची मूर्ति आहे. इतर ठिकाणीं शिवाच्या देवालयांत शिवलिंग अगदीं खोल असलेलें आढळून येतें, तसा प्रकार येथें नाहीं. लेण्यांच्या इतर भागाच्या सपाटीबरोबरच शिवलिंग आहे. हा मात्र ह्या 'लेण्यांतील शिवालयांचा विशेष आहे. कारण, इतर

ठिकाणच्या शिवालयांतून शिवलिंग खोल असतें. लेण्यांतून बहुतेक चोहोंकडे प्रकाश चांगला आहे. जेथें खोल्या काढल्या आहेत त्यांत मात्र प्रकाशाचा बहुतेक अभाव आहे. गाभारा बहुधा सहा सात हात रुंद व आठ हात लांब असा असून त्याचीं दारें सुंदर, नक्षी कोरलेलीं आणि दोन्ही बाजूंस द्वारपालांनीं रक्षिलेलीं आहेत. सर्व लेण्यांचा हा साधारण प्रकार झाला. परंतु कैलासाला दुसरें साम्य नाहीं अथवा विश्वकर्म्यासही मोकबला नाहीं. त्यांच्याविषयीं बोलावयाचें ह्मणजे गगनाविषयीं बोलतांना ज्याप्रमाणें 'गगनं गगनाकारं' ह्मणावें लागतें, तद्वतच कैलासही कैलासासारखेंच ह्मणावें लागतें!

कैलास हें लेणें देऊळ आहे. अशा प्रकारचें अल्प प्रमाणावर देऊळ खोदण्याचे कामास दुसरीकडे सुरुवात झाली होती, असें दिसतें. दशावतारापुढें उघड्या जागेवर तुटक असें एक लहानसें देऊळ आहे. त्याप्रमाणें इंद्रसभेपुढेंही आहे. कैलासांत शिरल्याबरोबर दोन्ही बाजूंस हत्ती दिसतात. इंद्रसभेपुढेंही एक हत्ती आहे. जेथें देवळ्या आहेत, तेथें मूर्ति खोदलेल्या आहेत व त्यांतही साम्य बरेंच दिसून येतें.

मूर्तींच्या आंगावरील दागदागिन्यांचें निरीक्षण करून पाहिलें असतां हिंदूंच्या आणि बुद्धांच्या लेण्यांतील मूर्तींच्या आंगावरील दागिन्यांत बराच सारखेपणा दिसून येतो. खांबावरील नकशीचे नमुनेही कमीअधिक प्रमाणानें तेच आहेत. वस्त्रप्रावरणांनीं युक्त अशा मूर्ति नाहींतच असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पोषाख ह्मणजे एक शिरस्त्राण आणि कंबरपट्टा. पुराणांतील कथानकांमध्यें स्त्रीपुरुषांच्या पोषाखांचीं भपकेदार वर्णनें आहेत. परंतु त्याप्रमाणें येथें कोरलेल्या मूर्तींवर वस्त्रें नाहींत अथवा भूषणेंही नाहींत. कोणाही मूर्तीच्या आंगांत आंगरखा नाहीं किंवा डोक्यास पागोटें नाहीं. बुद्धाची मूर्ति सर्वत्र बहुतेक नग्न दिसते, व जेथें आच्छादनासारखें दिसतें तेथें हल्लीं जैनांतील जती गळ्याभोंवतीं ज्याप्रमाणें एखादें वस्त्र गुंडाळतात त्याप्रमाणें उपरणेंवजा कांहीं वस्त्र पांघरल्याचें दाखविलें आहे. बुद्धाच्या मूर्तीभोंवतीं जी सेवाधारी मंडळी दाखविली आहे त्यांच्या गळ्यांत जानव्याप्रमाणें खोदलेलें आहे. बौद्धमताचा प्रसार ज्या काळीं झाला त्या

वेळीं पुष्कळ ब्राह्मण बौद्धांचे अनुयायी बनले असतील त्याला उद्देशून या मूर्ति खोदलेल्या असाव्या, किंवा ब्राह्मणासारख्या स्वतःस श्रेष्ठ समजणाऱ्या व वैदिक धर्माच्या मुख्य आधारस्तंभ गणलेल्या लोकांस सुद्धां आमच्या गुरूनें—मुख्य धर्मप्रचारकानें—सेवा करावयास लाविलें, हें दर्शविण्याचा हेतु नसेल कशावरून ?

कांहीं ठिकाणीं मूर्तींच्या उजव्या दंडाला दोरखंड गुंडाळल्यासारखें दिसतें, तें कशाचें द्योतक असेल तें असो. गळ्यांत माळा, कानांत बाळ्या, कुंडलें, पायांत पैंजण आणि जोडवीं हीं सर्व लेण्यांतील मूर्तींच्या आंगावर आहेत. लेण्यांतील मूर्तींचा एकमेकांशीं संबंध जुळविण्याचें काम कठीण आहे. तथापि कांहीं प्रमुख मूर्तींसंबंधानें दिसून येणाऱ्या साम्याचा उल्लेख केल्यास वावगें होणार नाहीं असें वाटतें.

या जगाच्या उत्पत्तीविषयीं पौराणिक कल्पना अशी आहे कीं, जग निर्माण करण्यापूर्वी परमेश्वरानें शेषशायी भगवानाचा अवतार घेतला होता. शेषशायी भगवानाचें चित्र ह्मणजे भगवान् नारायणानें शेषानें आपल्या शरीराच्या केलेल्या शय्येवर शयन केलें आहे, नाभिकमलापासून निघालेल्या कमलपुष्पावर भगवत्पुत्र ब्रह्मदेव बसलेला आहे, व भगवंताच्या मस्तकावर शेषानें आपल्या सप्तफणांनीं छाया धरलेली आहे. हें झालें हिंदूंनीं पूज्य मानिलेल्या शेषशायीचें वर्णन. त्या मूर्तीसारख्या मूर्ति बुद्धांच्याही लेण्यांत सांपडतात. जगरनाथसभेंत जी बुद्धाची मूर्ति आहे ती उभी असून उघडी आहे. या मूर्तीच्या आंगावर दागिने वगैरे कांहीं नाहींत, पण ती सर्पाला टेंकून उभी असून तिच्या मस्तकावर त्यानें आपल्या फणांनीं छाया धरिली आहे. लंकेंत जीं बौद्धानुयायांचीं देवळें आहेत, त्यांतील बुद्धांचें व हिंदूंच्या शेषशायीचें फार साम्य आहे. फक्त नाभिकमलांतून निघालेल्या ब्रह्मदेवाचा अभाव बुद्धाच्या लेण्यांत व देवळांत दिसून येतो. शेषशायीला सर्व ऐश्वर्यसंपन्न परमेश्वराचा अवतार समजण्यांत येतें. त्याप्रमाणेंच बुद्धालाही त्याचे अनुयायी समजतात. तेव्हां ही अशा प्रकारच्या मूर्तीची कल्पना प्रथम हिंदूंनीं बसविली व त्यांतील कांहीं भाग कमी करून

बौद्धांनीं तिचें अनुकरण केलें, किंवा उलट प्रकार झाला, हें सांगतां येत नाहीं. तथापि बौद्धांनीं प्रचारांत असलेल्या स्वरूपाला निराळें रूप देण्याचा प्रयत्न केला असावा हें जास्त संभवनीय दिसतें.

डुमाळ लेण्यांत कमलपुष्पावर बुद्धाप्रमाणें आसन घालून बसलेली एक मूर्ति आहे. तिला लेण्यांची माहिती देणारे लोक यमधर्म अथवा धर्मराज असें नांव देतात. कमलपुष्पाचा देंठ दोन मूर्तींनीं धरलेला असून त्या मूर्तींच्या मस्तकांवर नागांनीं छाया धरलेली आहे. ही धर्मराज नामाभिधान पावलेली मूर्ति बुद्धाचीच असली पाहिजे असें ज्यांनीं बरींच लेणीं लक्ष्यपूर्वक पाहिलीं आहेत अशांचें ह्मणणें आहे. कारण अशाच प्रकारची मूर्ति एलिफंटा लेण्यांत, कानेरी येथील लेण्यांत व कार्लीच्या लेण्यांत आढळून येते. शिवाय बुद्धाला हिंदूंनीं धर्मराज हें नांव दिलें असावें असें दिसतें. कारण बौद्धधर्माची उत्पत्ति जरी हिंदुधर्मापासून प्रथम हिंदुस्थानांत झाली असली, तरी तो आपल्या जन्मभूमींत लुप्तप्राय झाला. पण इतर देशांत त्याचें वर्चस्व कायम राहिलें. त्या धर्माच्या मूळ प्रचारकास कोठें गौतम ह्मणूं लागले, कोठें अमितबुद्ध, कोठें बुद्ध व शाक्यमुनि हीं नांवें मिळालीं आणि भूतान व तिबेटमध्यें त्याला महामुनि आणि धर्मराज ह्मणूं लागले. कार्ली येथील ब्राह्मण लोक ज्या लेण्यास धर्मराजाचें लेणें ह्मणतात व ज्या लेण्यांत हल्लीं शिवपार्वतीस प्राधान्य मिळालें आहे त्या लेण्यांतील धर्मराजाच्या मूर्तीचें बुद्धाच्या मूर्तीशीं हुबेहुब साम्य आहे.

भाग्यश्री भवानी अथवा लक्ष्मी ही मूर्ति लेण्यांत बऱ्याच ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते. भवानीचें वाहन व्याघ्र आहे हें कबूल, परंतु तिच्या मस्तकापासून वृक्ष उगवल्याचें भवानीच्या कोणत्याही चित्रांत अथवा भवानीच्या कोणत्याही देवळांत दिसून येत नाहीं. शिवाय कैलासांत शिरतांच सन्मुख जी लक्ष्मीची मूर्ति आहे ती मांडी घालून बसलेली आहे. यावरून या मूर्तींचा बौद्धांनीं पूज्य मानिलेल्या मूर्तींशीं कांहींतरी संबंध असला पाहिजे असा साहजिकपणें तर्क धांवतो. याप्रमाणें लेण्यांत एकमेकांशीं सादृश्य दाखविण्याऱ्या गोष्टींचा थोडक्यांत उल्लेख केला आहे.

# लेण्यांविषयीं सामान्य विचार व अभिप्राय.

लेण्यांचें व त्यांतील मूर्तींचें येथवर केलेलें वर्णन वाचून, हीं लेणीं पृथ्वीवरील चमत्कारांपैकीं एक मोठा चमत्कार आहेत अशी वाचकांची खात्री होऊन चुकली असेल. त्यांचें विराट् स्वरूप पाहून साधारण जनसमूहाला तीं दैविक कृत्यें आहेत असें साहजिकपणें वाटतें. त्यांतूनही आमच्या लोकांची साधारणपणें कोणत्याही असाधारण गोष्टीस दैविक स्वरूप देण्याकडे पुरातन प्रवृत्ति आहे. या देशांत जे थोर पुरुष होऊन गेले, व ज्यांचें यश पुराणांतरीं वर्णिलें आहे, त्यांस देवाचे अवतार मानणें हें त्याचेंच द्योतक आहे. सकृद्दर्शनीं असंभाव्य दिसणाऱ्या गोष्टींस दैविक रूप देण्यांत एका विशिष्ट वर्गाचा आपला चरितार्थ चालविण्याचा हेतु असतो. त्यांतले त्यांत या देशांतील लोक विशेष पुराणप्रिय आणि गतानुगतिक असल्यामुळें ते लेण्यांना पांडवकृत्यें मानतात. द्यूतांत हरल्यावर बारा वर्षें पांडवांनीं वनवासांत काढिलीं. वनवासांत असतां ठिकठिकाणीं राहण्यासाठीं त्यांनीं लेणीं कोरिलीं. पांडवांचें सर्वच विलक्षण. प्रत्यक्ष ईश्वर त्यांचा सारथी बनला होता, यापेक्षां त्यांच्या सामर्थ्याचें आणखी जास्त वर्णन काय करावयाचें आहे? पांडवांपैकीं भीमाची शक्ति अचाट होती. त्यास दररोज खावयास दीडखंडी अन्न लागत असे! अशा पांडवांनीं एका रात्रींत हीं लेणीं कोरून टाकलीं, असा जुन्या लोकांचा विश्वास आहे. ऋषींच्या समागमांत काळ कंठीत प्रवास करीत असतां त्यांनीं कदाचित् हीं कृत्यें केलीं असल्यास न जाणों! नाहीं होय तरी कसें ह्मणावें? हल्लींच्या विचारयुगांत लेण्यांच्या दैविकपणावर जरी विश्वास बसला नाहीं, तरी तीं सांप्रतच्या या देशांतील कर्तृत्वहीन रहिवाशांपेक्षां विशेष पुण्यवान् आणि कर्तृत्ववान् श्रेष्ठ पुरुषांचीं कृत्यें होत, यांत काडीमात्र संशय नाहीं.

जेव्हां हीं लेणीं अस्तित्वांत आलीं तेव्हां देशांत सर्वत्र शांतता असली पाहिजे. लोक सुखी, राजे बलाढ्य, धनाढ्य आणि कुशल कारागिरांस व

हुन्नरी लोकांस उत्तेजन देण्यांत तत्पर असले पाहिजेत. त्याशिवाय प्राचीन काळच्या लोकांनीं आपल्या दीर्घोद्योगाचीं व कौशल्याचीं हीं स्मारकें खचीत करून ठेविलीं नाहींत. एका गणिती माणसानें फक्त वेरूळचीं लेणीं पाहून असा हिशेब बसविला आहे कीं, तीं लेणीं कोरण्यास अठ्ठेचाळीस लक्ष माणसांस एकवीस वर्षें लागलीं असतील! यावरून या कामीं खर्ची पडलेल्या श्रमाचें व द्रव्याचें अनुमान ज्याचें त्यानें बांधावें हें बरें. उगीच रुपये, आणे आणि पै ह्यांची चूक पडल्यास त्याची जबाबदारी घ्यावी कोणीं?

ज्यांना पाहण्यास दृष्टि नाहीं त्यांस लेण्यांचें महत्व वाटत नाहीं. लिन्स चोटेन नांवाच्या एका जुन्या प्रवाशानें लेण्यांविषयीं असें ह्मटलें आहे कीं, तीं पाहण्यास भेसूर आणि दिसण्यांत राक्षसी आहेत. मंद दृष्टीच्या माणसांचा असा ग्रह व्हावा, यांत काय नवल आहे? ह्या कोरींव लेण्यांचें वर्णन वस्तुस्थितीस धरून करणें खरोखर अशक्य आहे. त्यांचें मूर्तिमंत चित्र जरी पाहणाराच्या अंतर्दृष्टीपुढें उभें राहतें, तरी त्यांच्या सौंदर्याचें अगर भव्यपणाचें वर्णन यथायोग्य करणें दुर्घट आहे. पाहिल्याबरोबर पाहणाराच्या मनांत आनंद आणि आश्चर्य या दोन्ही भावनांच्या लाटा उसळावयास लागतात व त्या गोंधळांत तो गुंगून जातो. पृथ्वीच्या पाठीवर अनेक मोठमोठ्या इमारती आहेत. त्या पाहून मनास आनंदही होतो. पण त्या अस्तित्वांत कशा आल्या असाव्या याबद्दल कल्पना करीत बसावें लागत नाहीं. परंतु आपल्या पूर्वजांनीं—मग त्यांची संख्या कितीही अगणित असो—मोठ्या दीर्घोद्योगानें—आणि तो कितीही अचाट असो—विपुल द्रव्य खर्च करून—त्यांची संपत्ति कितीही अपरंपार असो—कणखर दगडाच्या खडकावर हल्ला करून टांकीच्या घावांनीं शंभर फूट उंचीचा डोंगर कोरून कैलासासारखें अप्रतिम लेणें कसें कोरिलें असेल याबद्दल एकाएकीं मति चालत नाहीं.

तरी पृथ्वींतल्या जुन्या इमारतींमध्यें ह्या इमारती सर्वोत्तम गणिल्या आहेत, ह्याविषयीं आह्मां हिंदुस्थानवासीयांस अभिमान वाटावा. इजिप्त देशांतील पिरामिडांपेक्षांही ह्या श्रेष्ठ असल्या पाहिजेत. परंतु तें ठरविण्याचें काम माहीतगार माणसांवरच आह्मीं सोंपविलें पाहिजे. ह्मणून, लेणीं पाहून

मनावर जें प्रतिबिंब उठलें, तें येथें आह्मीं नमूद केलें आहे. तें करितांना हें अवाढव्य काम पाहून मनावर झालेल्या परिणामाची झांक कांहीं अंशीं वर्णनांत उतरली असली तर क्षम्य आहे, असें वाचक कबूल करतील. मोठमोठ्या अर्वाचीन इमारती पाहून थक्क झाल्यामुळें त्यांचें वर्णन करितां येत नाहीं, असें ह्मणणारे लोक आहेत. अशांच्या तोंडून ह्या लेण्यांचें वर्णन करणें मानवी शक्तीच्या बाहेर आहे असे उद्गार खात्रीनें निघतील. तथापि, शोधक युरोपियन मर्मज्ञ ह्यांविषयीं काय ह्मणतात, हें येथें सांगितलें असतां, ह्यांचें खरें महत्व अधिक लक्षांत येईल असें वाटतें. हीं लेणीं पाहून कॅप्टन सिली नांवाच्या एका गृहस्थानें असें ह्मटलें आहे कीं, हुबेहुब वर्णन उठवून देण्यांत ज्याचा कोणी हात धरणार नाहीं अशा सर वाल्टर स्काटसारख्या प्रसिद्ध कादंबरीकारास अथवा अलीकडील एडिंबरो आणि क्वार्टर्ली रिव्हुसारख्या नामांकित मासिक पुस्तकांमध्यें गहन विषयांवर लेख लिहिणाऱ्या विद्वान् लेखकांस सुद्धां या लेण्यांचें वर्णन करणें बरेंच जड जाईल.

इंग्रज गृहस्थांनीं आह्मांवर जे कांहीं उपकार केले आहेत, त्यांतच आमच्या प्राचीन इमारतींचें महत्व त्यांनीं जगाच्या नजरेस आणून दिलें हा एक प्रधान होय. कोरींव लेणीं पाहून आपलें मत काय बनलें याबद्दल बऱ्याच गृहस्थांनीं लेख लिहून ठेविले आहेत. त्यांपैकीं कांहींचा गोषवारा येथें दिल्यास तो अप्रस्तुत होईल, असें वाटत नाहीं. पेशव्यांच्या दरबारीं इंग्रजसरकारचे वकील असलेले सर चार्लस मालेटसाहेब लेण्यासंबंधानें पुढील मत प्रदर्शित करितात. “आपण लेण्यांच्या रचनेचें अथवा त्यांत दिसून येणाऱ्या विलक्षण कोरींव कामाचें विचारपूर्वक मनन करावयास लागलों तर राजवाड्याच्या तोडीचीं कोरींव लेणीं डोंगराच्या पोटांत कोरलेलीं पाहून आपण आश्चर्यचकित होऊन जातों. प्राचीन कथांमध्यें ज्यांचें वर्णन आहे अशा चिन्हांनीं आणि मूर्तींनीं भरलेलीं हीं लेणीं पाहून, ज्यांनीं तीं निर्माण केलीं त्यांच्या ठिकाणीं ओतप्रोत धार्मिकबुद्धि वसत असली पाहिजे यांत बिलकुल संदेह नाहीं, अशी मनाची खात्री पटते. सत्कृत्यास प्रेरणा करणारें धार्मिकबुद्धी-

सारखें दुसरें कोणतेंही बलवत्तर साधन नाहीं. आश्चर्यचकित करणाऱ्या कैलासाचा प्रवेशमार्ग इतर लेण्यांहून विशेष शोभिवंत आहे. विश्वकर्मा हें लेणें सौंदर्यांत दुसऱ्या कोणत्याही लेण्याहून कमी नाहीं. त्याची आकृति अनन्यसाधारण आहे व देखावाही शोभिवंत आहे."

लेफ्टनंट कर्नल फिट्झ क्लारेन्स लेणीं पाहून ह्मणतातः— मीं जे चमत्कार पाहिले—लेणीं हेच ते चमत्कार होत.—ते पाहून माझ्या डोळ्यांचें पारणें फिटलें आणि मनाची समाधानवृत्ति बनून राहिली. अक्राळविक्राळ आणि चमत्कारिक मूर्ति पाहण्याची नेत्रांस संवय नसल्यामुळें ते अगदीं दमून गेले आणि आश्चर्यकारक देखावा पाहून नानाविध कल्पना व विविध मनोविकार यांनीं एकदम उचल खाल्ल्यामुळें मनाची अगदीं तारांबळ उडाली आणि शांत मनानें लेण्यांविषयीं ठाम मत ठरविण्याच्या कामीं मी अगदीं निराश झालों. ज्या विलक्षण देवभोळेपणामुळें हीं लेणीं कोरण्यास लोक उद्युक्त झाले असतील त्या देवभोळेपणाविषयीं मनांत आदर आणि पूज्य बुद्धि उत्पन्न होते. सततोद्योग, बुद्धिमत्ता आणि दीर्घ परिश्रम यांच्या बळावर केलेलीं हीं प्राचीन व अवाढव्य कृत्यें अवलोकन करून त्यांबद्दल विलक्षण कौतुक वाटतें. ज्या धर्मानें एवढें अजस्र कृत्य करण्याची प्रेरणा केली त्या धर्माविषयीं माझ्या मनांत आदरबुद्धि आणि कृतज्ञता उभी राहिली. माझ्या सभोंवतीं असलेली प्रत्येक वस्तु, ज्यांस शेंकडों वर्षें होऊन गेलीं आहेत अशा राष्ट्रांच्या, व्यक्तींच्या आणि कलाकौशल्याच्या गोष्टी माझ्या कानांत सांगत आहे, असें मला वाटलें. जीं कृत्यें फार प्राचीन काळीं निर्माण झालीं, ज्यांच्या निर्माणकर्त्यांचा थांग सुद्धां लागणें कठीण, व जीं, हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून सर्वत्र विध्वंस करणाऱ्या मुसलमानांच्या तडाख्यांतून वांचलीं, त्या कृत्यांच्या उत्पादकांच्या हल्लींच्या वंशजांमध्यें त्यांच्या उद्योगाची, साहसाची व शिल्पशास्त्रांतील नैपुण्याची बरोबरी करणारे लोक सांपडतील काय ह्मणून हिंदुस्थानच्या हल्लींच्या स्थितीचा वरवर विचार केला. आमचा ख्रिस्ती शक अस्तित्वांत येण्याच्या पुष्कळ अगोदर ब्राह्मण क्षत्रियांनीं आपल्या नैसर्गिक पवित्रपणानें आपल्या

धार्मिक संस्थांस व धर्मबलास शुद्ध पवित्रपणा मिळवून दिला आणि प्रत्यक्ष पर्वतास जणों काय बोलावयास लाविलें, ही गोष्ट आणि गेल्या दोन हजार वर्षांत हिंदुस्थानांत ज्या अनेक उलाढाली झाल्या त्या सर्व आभासाप्रमाणें माझ्या डोळ्यांपुढून गेल्या. ज्या काळीं शिल्पकलांचीं हीं अवाढव्य स्मारकें अस्तित्वांत आलीं त्या अज्ञात काळाविषयीं व हल्लींच्या काळाविषयीं मी विचार करीत कैलासांत उभा राहिलों असतां मनुष्यानें जड पदार्थांवर इतक्या पूर्णत्वानें साम्राज्य बसविलें आहे असें या कोरींव लेण्यांच्या बरोबरीस योग्य असें दुसरें एखादें उदाहरण पृथ्वीवर कोठें आहे काय हें शोधण्याचा मीं व्यर्थ प्रयत्न केला."

कर्नल कॉल यांनीं असे उद्गार काढिले आहेत कीं "कलांचीं, शास्त्रांचीं आणि सुधारणेच्या प्राचीनत्वाचीं चिन्हें भागीरथीनदीपासून तों केप कामोरीनपर्यंत पसरलेल्या हिंदुस्थानच्या द्वीपकल्पांत जितकीं सांपडतात, तितकीं जगांतील दुसऱ्या कोणत्याही भागांत सांपडणार नाहींत असें बिनधोक ह्मणण्यास हरकत नाहीं. राजवाडे मोडकळीस येतील, जंगी पूल पडतील आणि काळाच्या कुरतुडण्यास जंगी इमारती बळी पडतील; परंतु प्राचीन वैभवाची साक्ष पटविणारीं व हल्लींच्या काळीं सर्वांचें कौतुकस्थान बनलेलीं व निरवधि कालपर्यंत कुतूहलास्पद होणारीं वेरूळ येथील लेणीं आपल्या पुरातन वैभवासह प्रशांत अशा एकांत स्थळीं सदोदित वास करितील."

कॅप्टन सिलीचें मत—"हीं लेणीं पाहतांना प्रत्येक पावलास मन वेधून जातें. आणि विशेष कौतुक वाटतें. फार काय, हल्लीं आहेत त्यांच्या ऐवजीं जर हीं लेणीं नुसत्या चुन्याविटांचीं बनविलेलीं असतीं आणि त्यांत मूर्ति व शोभिवंत नक्षीकाम वगैरे जरी नसतें तरी सुद्धां मन वेधलें असतें. परंतु दणगट खडकांतून अत्यंत त्रासदायक असें टांकीचें काम करून हीं लेणीं कोरिलीं आहेत असें जेव्हां आपण पाहातों तेव्हां खरोखर आपल्या आश्चर्यास सीमा राहत नाहीं. माझें मत कदाचित् चुकीचें असेल, परंतु नम्रपणें सांगण्याची मी परवानगी घेतों कीं, वेरूळ येथील लेण्यांच्या अगम्य

उत्पत्तीचा, त्यांच्या भव्य आकाराचा, शिल्पशास्त्रानुरूप सौंदर्याचा अथवा तेथील अगणित रेखलेल्या मूर्तीचा विचार केला तर ह्या लेण्यांशीं बरोबरी करणाऱ्या प्राचीन इमारती जगांत दुसरीकडे कोठेंही नाहींत."*

प्राचीन ऋषि फार एकांतप्रिय होते. नगरांत समाजांत राहून आयुष्य कंठण्याचा त्यांस कंटाळा असे. ते नेहमीं अरण्यांत पर्णकुटिका बांधून अथवा डोंगरांत गुहा कोरून तेथें आपल्या शिष्यगणासह राहत असत. अशा ठिकाणीं राहून त्यांनीं संस्कृत वाङ्मयांत सांठविलेलें ज्ञानभांडार अस्तित्वांत आणिलें, गहन विषयांचा विचार केला, अनेक महत्वाचे शोध लाविले आणि चौदा विद्या व चौसष्ट कळांचें ज्ञान उपलब्ध करून दिलें. त्यांच्या ज्ञानभांडाराचा रसास्वाद आज जगावरील सर्व ज्ञाते लोक चाखीत आहेत, व मनाची तृप्ति करून घेत आहेत. ज्ञानार्जनाला वास्तविक एकांत स्थळेंच योग्य होत. विद्यार्थ्यांस खरी शिस्त लागण्यास व सर्वस्वी त्यांचें चित्त विद्येकडे लागण्यास गुरूंचा व त्यांचा एकत्र वास व इतर व्यवहारी जनांपासून अलिप्तपणा हे अत्यंत इष्ट आहेत. ही पद्धति फार प्राचीनकाळीं आपल्या देशांत होती व हल्लींही कमीअधिक प्रमाणावर सुधारलेल्या राष्ट्रांत दिसून येते. वेरूळ येथील कांहीं लेण्यांच्या आकारांवरून असें स्पष्ट दिसून येतें कीं त्यांचा उपयोग पाठशाळेच्या कामीं खात्रीनें होत असला पाहिजे. व केव्हां तरी तेथें विद्वान् शिक्षक आपल्या शिष्यगणासह राहून विद्यादानाचें पवित्र कार्य करीत असले पाहिजेत. पारफिरी नांवाच्या तिसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या एका तत्ववेत्त्यानें एके ठिकाणीं असें लिहून ठेविलें आहे कीं, एलिफंटा येथील एका लेण्यांत राहणाऱ्या ऋषीजवळ राहून त्याचें शिष्यत्व पत्करून पारशी धर्माचा प्रचारक झोरोआस्टर यानें विद्या संपादन केली अशी दंतकथा आहे.

हजारों वर्षांपूर्वी या देशांतील लोकांच्या आंगीं सर्व जगास थक्क करून सोडणारीं अचाट कृत्यें करण्याचें सामर्थ्य होतें, याची साक्ष हीं लेणीं पटवितात. त्या सामर्थ्याचा व तें आंगीं येण्यास आवश्यक अशा गुणसमुच्चयाचा ऱ्हास होण्यास काय कारणें झालीं असावीं, हा प्रश्न साहजिकपणें

* कॅप्टन जान बी. सिली यांचें 'वंडर्स आफ् एलोरा.'

उद्भवतो. त्याचें उत्तर प्रत्येकानें आपापल्या विवेचक सामर्थ्यानुरूप द्यावयास पाहिजे. आपण आहों त्या स्थितींत राहण्याच्या योग्यतेचे नाहीं आहों, सर्व विद्यांचें, हुन्नरांचें आणि कलाकौशल्याचें माहेरघर अशी ज्यांच्या बुद्धिसामर्थ्यामुळें व कर्तबगारीमुळें हिंदुस्थानची सर्व जगभर ख्याति झाली होती, अशा वैभवशाली पूर्वजांचे आपण वंशज आहों, व एके काळीं सुवर्णभूमि ह्मणून नांवाजलेल्या आर्यावर्तांत आपण जन्मास आलों आहों, हें आपण विसरतां कामा नये. प्राचीन काळच्या वैभवाच्या मानानें आपण हल्लीं किती तरी हीन स्थितीला पोंचलों आहों ! आमचे धंदे बुडाले, कारागिरी नष्ट झाली, कल्पकता अस्तास गेली, आणि सर्वतोपरी आह्मी परावलंबी बनलों. असें होण्याचें कारण काय? आमच्या राष्ट्र पुरुषाचें शील बिघडलें, दानत नाहींशी झाली व खरी, शुद्ध आणि पवित्र धर्मबुद्धि विलयास गेली, व त्यामुळें समाजास कीड लागून सर्व गुणांचा ऱ्हास झाला नसेल कशावरून? यहुदी लोक आपणां स्वतःस ईश्वराच्या विशेष कृपेंतले समजतात. पण जगाच्या पाठीवर खऱ्या कृपेंतले जर कोणी असले तर आह्मी हिंदु लोक आहों, असें एका थोर आणि नामांकित पुरुषानें ह्मटल्याचें आह्मांस स्मरतें. आमच्या लोकांचा पुनः भाग्योदय व्हावा व आमच्या राष्ट्राची जगांत प्रतिष्ठा वाढावी असा ईश्वरी नेमानेम स्पष्ट दिसतो. आपण कोण, आपलें कर्तव्य काय, एकंदर जगांत उलाढाली काय चालल्या आहेत, आपली पूर्वार्जित संपत्ति किती मोलवान् आहे इत्यादि गोष्टींचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास आत्मप्रत्यय उत्पन्न व्हावा लागतो. तो उत्पन्न करणारा मार्गदर्शक ईश्वरी योजनेनें आह्मांस लाभला आहे. त्याच्या साहचर्यानें आमचे डोळे हळुहळु उघडावयास लागले आहेत; ज्या गोष्टींस खऱ्या धर्मानें कधींही प्राधान्य दिलें नाहीं अशा गोष्टींचा काथ्याकूट करण्यांत काळाचा अपव्यय न करण्याकडे आमची हळुहळु प्रवृत्ति होऊं लागली आहे; आणि खऱ्या उन्नतीचे व प्रगतीचे मार्ग, अस्पष्ट कां होईनात, पण, दिसावयास लागले आहेत. आपण जिवंत झऱ्याचें पाणी पीत आहों, तेव्हां निराश होण्याचें कारण नाहीं.

अशा ढुरुपानें कैलासासारखीं अचाट कृत्यें करणें अशक्य वाटणार नाहीं. आपणांस ईर्षा उत्पन्न करणारा व सन्मार्ग दाखविणारा इंग्लंदासारखा दक्ष आणि उदारमतवादी राज्यकर्ता असल्यावर आपला आशावृक्ष खात्रीनें बळावलाच पाहिजे.

साहस, उद्योग, प्रवास अथवा विद्याव्यासंग वगैरे मनुष्यास विशेषतः तरुणपणीं साध्य असतात. त्यांपासून होणाऱ्या सुखाचा आणि आनंदाचा अनुभव तारुण्यांतच मिळतो व तेव्हां नवी उमेद असल्यामुळें त्याची विशेष गोडी लागते, व वाटतेही. ह्मणून तरुणपणाचे दिवस आपल्या आयुष्यांत सर्वांत जास्त सुखाचे मानिले आहेत. तरुणपणीं अडचणींची, संकटांची, गैरसोयींची अगर प्रसंगविशेषीं कोसळणाऱ्या दुःखाची फारशी परवा न करितां तरुण माणूस सुखाकडे एकसारखी धांव घेत असतो. अशा रीतीनें जो काळ प्रत्येकास प्राप्त होतो त्या सर्वांत विशेष सौख्याचा काळ हीं लेणीं पाहतांना आह्मांस वाटला. आणि एका कवीनें ह्मटल्याप्रमाणें "गेला, आतां परत येणार नाहीं" ह्या वाक्याची आठवण होऊन त्याबद्दल जेव्हां जेव्हां लेण्यांचें स्मरण होतें तेव्हां तेव्हां हळहळ वाटल्याशिवाय राहत नाहीं. या लेण्यांची कीर्ति नेपाळांतील एका कवीनें दुसऱ्या प्रसंगास उद्देशून केलेल्या पुढील श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें—

यावच्चंद्रदिवाकरावुदयतो यावन्महीमण्डलं ।
यावत्पर्वतनन्दिनी पशुपतेरुत्संगमालिंगति ॥
यावज्जन्हुकलिन्दयोरपि सुते तावद्भरीवर्तता ।
* * * एषा यशोवल्लरी ॥

अक्षय राहील यांत संशय नाहीं.



# लेण्यांचा काळ.

लेण्यांच्या काळासंबंधानें नक्की माहिती उपलब्ध नाहीं. खुद्द लेण्यांत खोदणारांनीं ज्या काळीं लेणीं कोरिलीं तो काळ खोदून ठेविलेला नाहीं. तेव्हां इतर रीतीनें जी माहिती मिळेल त्यावर व दुसऱ्या ऐतिहासिक प्रमाणांवर अवलंबून राहणें भाग आहे. इतकीं जुनाट कृत्यें केव्हां व कशीं अस्तित्वांत आलीं असावीं हें जाणण्याची जिज्ञासा चौकस बुद्धीच्या माणसाच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावी, हें साहजिक आहे. आणि तदनुरूप चौकस माणसांकडून अशा प्रकारची माहिती गोळा करण्याचा प्रयत्न आजपर्यंत झालेला आहे. हिंदुस्थानचा साधार आणि विश्वसनीय असा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहीं, व त्याचीं साधनेंही असावीं तशीं नाहींत. तथापि होतां होईल तितकी जुनी माहिती मिळविण्याचा अनेक जिज्ञासूंनीं प्रयत्न केला आहे व तो बराच सफल झाला आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या मिळविलेल्या माहितींत जुने लेख, ताम्रपत्रें, शिलालेख, शिलाशासनें इत्यादि फार महत्वाचीं होत. त्यांपैकीं एका ताम्रपटावरील लेखांत कैलासाचा व त्याच्या कर्त्याचा स्पष्ट नामनिर्देश आहे. त्यांतील लेखांत शकही दिला आहे. बिलकुल माहिती नसण्यापेक्षां थोडी फार माहिती सांपडणें कांहीं वावगें नाहीं. निबिड अरण्यामध्यें मार्ग काढण्यासाठीं तळमळणाऱ्या वाटसराला एखादी पाऊलवाट सांपडल्याबरोबर ज्याप्रमाणें आनंद होण्याचा संभव आहे तद्वतच शोधकांना त्यांच्या परिश्रमानें उपलब्ध झालेल्या माहितीमुळें आनंद वाटल्यावांचून राहिला नसेल. या माहितीनें निदान कैलास या लेण्यासंबंधानें आपणांस निश्चयात्मक रीतीनें लिहिण्यास आणि बोलण्यास आधार सांपडला आहे. महाराष्ट्रांत पूर्वीं राष्ट्रकूट घराणें फार उदयास येऊन गेलें. या घराण्यांतील राजांनीं दक्षिणेंत कांहीं शतकें राज्य केलें. त्याचा वृत्तांत डाक्टर भांडारकरांच्या दक्षिणेच्या जुन्या इतिहासांत सविस्तर दिला आहे. त्या घराण्यांत होऊन गेलेल्या राजांपैकीं पहिल्या कृष्णराजानें कैलास लेणें कोरिलें असावें हें पुढील उताऱ्यावरून दिसतें.

धर्मात्मनस्तस्य नृपस्य जज्ञे सुतः सुधर्मा खलु कृष्णराजः ।
यो वंशमुन्मूल्य विमार्गभाजं राज्यं स्वयं गोत्रहिताय चक्रे ॥
एलापुराचलगताद्भुतसंनिवेशं यद्वीक्ष्य विस्मितविमानचरामरेन्द्राः ।
एतत्स्वयम्भु शिवधाम न कृत्रिमे श्रीर्दृष्टेदृशीति सततं बहु चर्चयन्ति ॥
भूयस्तथाविधकृतौ व्यवसाय हानिरेतन्मया कथमहो कृतमित्यकस्मात् ।
कर्तापि यस्य खलु विस्मयमाप शिल्पी तन्नाम कीर्तनमकार्यत येन राज्ञा ॥

श्रीराष्ट्रकूट राजघराण्यामध्यें गोविंदराज नांवाचा एक नामांकित राजा होऊन गेला. त्याच्या मागून दानशूरत्वाच्या कामीं बलीपेक्षांही ज्याची जास्त कीर्ति दिगंतरीं पसरली व जो प्रजेचें पालन करण्यांत विष्णूप्रमाणें दक्ष असे, असा त्याचा मुलगा श्रीकर्कराज गादीवर बसला. त्या धर्मात्म्या नृपाला एक सच्छील मुलगा झाला, ज्यानें कुमार्गाला लागलेल्या आपल्या नातलगाला राज्यभ्रष्ट करून स्वतःच्या घराण्याच्या हिताकरितां राज्यशकट हातीं घेतला असा कृष्णराज नांवाचा मुलगा त्याला झाला. त्या अतुल पराक्रमी कृष्णराजानें एलापुर पर्वतावर एक अद्भुत देवालय बांधविलें. तें इतकें अद्भुत होतें कीं, स्वर्गांत वास करणारे देव आपल्या विमानांतून जात असतां हें देवालय पाहून फार विस्मय पावतात व हें शिवालय खरोखर स्वयंभु आहे, कारण कृत्रिम ह्मणजे हातांनीं बनविलेल्या कामांत इतकें सौंदर्य दिसून येत नाहीं अशी देव नेहमीं चर्चा करितात. आणखी हें देवालय असें आहे कीं तें ज्यानें बांधिलें तो शिल्पी ह्मणजे कारागीर पुनः या देवळाप्रमाणें दुसरें देऊळ उठविण्याची आपल्या आंगांत ताकद राहिली नाहीं असें पाहून त्याचें त्यालाच आश्चर्य वाटून त्यानें 'अहो मीं हें देवालय बांधिलें तरी कसें?' असे उद्गार काढिले. याप्रमाणें वर दिलेल्या श्लोकांचा अर्थ आहे.

हा उतारा राष्ट्रकूट वंशांतील श्रीकर्कराज या राजानें भानुभट्ट नांवाच्या एका ब्राह्मणास एक गांव जाहगीर दिल्याबद्दलच्या सनदेंतला आहे. या ताम्रपटावर शक नाहीं त्यामुळें फक्त एवढ्या उताऱ्यानें कालनिर्णय

---

१ इं. ॲन्टिकारी व्हाल्युम १२ पान १५९. २ इं. अ. व्हा. १२ प. २२८.

करितां येत नाहीं. पण वरील लेखांचें पुष्टीकरण करणारें प्रत्यंतर दुसऱ्या एका लेखांत सांपडलें आहे. त्याचा उतारा देण्यापूर्वीं एक गोष्ट येथें नमूद करून ठेविली पाहिजे कीं, एलापूर हें ज्याला हल्लीं वेरूळ ह्मणतात तेंच किंवा दुसरें एखादें गांव आहे, याबद्दल थोडा मतभेद आहे. मि. फ्लिट यांचें मत असें आहे कीं, हें एलापूर नार्थ कॅनरा जिल्ह्यामध्यें असावें. पण डाक्टर बर्जेस नांवाच्या लेण्यासंबंधीं माहिती मिळवून एक मोठा ग्रंथ लिहिणाराच्या मतें एलापूर आणि वेरूळ हीं दोन्हीं नांवें एकाच गांवाचीं आहेत. आपल्या प्रांतांतील प्रसिद्ध प्राचीन शास्त्रवेत्ते डाक्टर भांडारकर यांनींही याबद्दल बरेंच विवेचन एका लेखांत केलें असून डाक्टर बर्जेससारखेंच आपलें मत प्रदर्शित केलें आहे.[२]

हें प्रत्यंतर राष्ट्रकूट राजघराण्यांतील दुसऱ्या एका राजानें दिलेल्या ताम्रपटांत सांपडतें. त्या राजाचें नांव अकालवर्ष होतें. या राजानें आपल्या कनिष्ठ बंधूच्या नांवानें एका ब्राह्मणाला सनद करून दिली आहे. या सनदेंत राजाची बरीच मोठी वंशावळी दिली आहे. त्यांत राजाच्या पूर्वजांपैकीं एका कृष्णराजासंबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे.

[३]तस्मादपालयदिमां वसुधां पितृव्यः
श्रीकृष्णराजनृपतिः शरदभ्रशुभ्रैः ।
यत्कारितेश्वरगृहैर्वसुमत्यनेक-
कैलासशैलनिचितेव चिरं विभाति ॥

अर्थः—त्याच्यानंतर त्याचा चुलता राजा कृष्णराज यानें पृथ्वीचें पालन केलें. तें शिवाचीं देवालयें बांधून केलें. तीं देवालयें अशीं आहेत कीं त्यामुळें पृथ्वी पुष्कळ कैलासपर्वतांनीं सुशोभित केल्याप्रमाणें शोभायमान दिसते.

ही सनद तिसऱ्या कृष्णराजानें दिली आहे. ह्या सनदेंत जी वंशावळी

---

१ इं. अॅ. व्हा. १२ पा. १५६. २ इं. अॅ. व्हा. १२ पा. २२९. ३ रायल एशियाटिक सोसायटीचें मुंबई शाखेचें जर्नल व्हा. १८ नं. ४९. पा. २४५.

दिली आहे तींत तेरा पुरुषांचीं नांवें दिलीं आहेत. हा ताम्रपट करून देणारा राजा तो तिसरा कृष्णराज. ज्यानें कैलास देऊळ कोरविलें तो पहिला कृष्णराज. पहिल्या कृष्णराजानंतर तिसरा कृष्णराजा राज्यारूढ होईपर्यंत मध्यंतरीं नऊ राजे होऊन गेले. राष्ट्रकूट राजघराणें ज्यानें विशेष उदयास प्रथमतः आणिलें त्या दन्तिदुर्ग राजाचा पहिला कृष्णराजा हा चुलता होता. ह्या वंशावळीस समर्थक असा उल्लेख दुसऱ्या एका ताम्रपटांत सांपडतो असें डाक्टर भांडारकर यांनीं, ज्या लेखांतून हा उतारा घेतला आहे त्या लेखांत ह्मटलें आहे. ज्या लेखांतील वर दिलेला उतारा आहे त्या लेखावर शकाचा उल्लेख पुढें दिल्याप्रमाणें आहे.

श्रीमान्यखेटे-राजधानीस्थितेन शकनृपकालातीत संवत्सरशतेष्वष्टासु द्वि-षष्ठ्याधिकेषु शार्वरि संवत्सरान्तर्गत वैशाख बहुल पञ्चम्यां मम प्राणेभ्योपि प्रियतमो कनीयसो भ्रातुः श्रीमज्जगत्तुंग देवस्य पुण्य यशोभिवृद्धये ॥

ह्मणजे या ताम्रपटावर शक ८६२ आहे. त्याच्या पूर्वीं निदान दोनशें वर्षांपूर्वीं कैलास देऊळ कोरविणारा कृष्णराजा राज्य करीत असावा. यावरून कैलासाचा काळ इ. स. ७०० च्या जवळ असावा असें अनुमान निघतें. जेवढी माहिती मिळाली तेवढी येथें नमूद केली आहे त्यावर ठाम मत देण्याचें काम प्राचीनवस्तुशास्त्रवेत्त्यांचें आहे. एवढें मात्र ह्मणण्यास हरकत नाहीं कीं या लेण्यांपैकीं एका प्रमुख लेण्याचा काळ ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकाच्या अलीकडचा नाहीं.

बौद्ध धर्माचा ऱ्हास व्हावयास लागल्यानंतर ज्यांत हिंदूंचें पूज्य दैवत शिवलिंग प्रधान आहे अशीं लेणीं अस्तित्वांत आलीं याबद्दल वाद नाहीं. ह्मणजे बौद्धांचीं लेणीं अगोदर बराच काळ अस्तित्वांत आलीं असावीं हें उघड आहे. वेरूळच्या लेण्यांचे प्रमुखपणें दोन विभाग करितां येतात. एक बौद्धानुयायांच्या लेण्यांचा व दुसरा हिंदुधर्मानुयायांच्या लेण्यांचा हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्यांत दुसऱ्या प्रकारच्या लेण्यांपैकीं प्रमुख अशा कैलासच्या लेण्याच्या काळासंबंधानें वर विवेचन

१ रा. ए. सो. मुंबई शाखेचें जर्नल व्हा. १८ नं. ४९ पा. २४८.

केलें आहे. आतां बौधानुयायांच्या लेण्यांचा काळ कांहीं ठरवितां येईल कीं नाहीं हें आपणांस पाहिलें पाहिजे. बुद्धाच्या निर्वाणाचा काळ इ. स. पूर्वी ५४३ होता हें बऱ्याच विद्वानांनीं ठरविलें आहे. ज्या खडकावर अशोकाचीं शिलाशासनें खोदलेलीं आहेत त्याच्या नजीकच्या प्रसिद्ध गिरनार पर्वतांतील लेण्यांत मूर्ती वगैरे नाहींत. बुद्धानें मूर्तिपूजेचा निषेध केलेला आहे. व जनसमूहानें तिजपासून पराङ्मुख व्हावें ह्मणून त्यानें उपदेश केला आहे. तेव्हां बुद्धानंतर लागलीच बुद्धाच्या मूर्तीची पूजा प्रचारांत आली असेल असें संभवत नाहीं. ती प्रचारांत येण्यास कांहीं तरी काल लोटला असेल. शिवाय ज्या अशोक राजानें बौद्ध धर्माचा प्रसार करण्याचा दीर्घ प्रयत्न केला, त्यानें महाराष्ट्रांत इ. स. पूर्वी २४६ वे वर्षीं धर्मप्रसारासाठीं प्रथम उपदेशक पाठविले असें महावंश नांवाच्या ग्रंथांत नमूद केलें आहे.

अशोकराजानें पाठविलेल्या उपदेशकांच्या उद्योगास फळ येण्यास कांहीं तरी काळ लोटला असेल यांत संशय नाहीं. वैदिक धर्माची किती जरी हीन स्थिति झालेली असली तरी लोकांनीं, हे नवीन धर्मोपदेशक आल्याबरोबर पूर्वीचे आचारविचार लागलीच टाकून दिले असतील असें संभवत नाहीं. या नूतन धर्माचा चांगला बस बसल्यानंतर त्याच्या धर्मानुयायांनीं आपलीं ठाणीं कायम करण्यास आरंभ केला असेल. आणि प्रथमतःच वेरूळच्या डोंगरांत त्यांनीं वास्तव्य केलें असावें असें मानण्यास जागा आहे. कारण वेरूळ हें इतर लेण्यांच्या मानानें एका बाजूस नसून त्याच्या भोंवतीं सुपीक प्रांत आहे. हें पहिलेंच वसाहतीचें ठिकाण असल्यामुळें मोठ्या प्रमाणावर असणें साहजिक आहे. अशोकानंतर निदान एकदोन शतकें तरी बौद्ध धर्माचा पगडा चांगला बसण्यास लागलीं असतील, असें यावरून अनुमान काढण्यास हरकत दिसत नाहीं. याशिवाय महाराष्ट्रांत बौद्ध धर्माचा विजयध्वज किती दिवस फडकत होता व त्यास केव्हां हद्दपार करण्यांत आलें याविषयीं राजावलीमध्यें ऐतिहासिक पुरावा सांपडतो. मल्हारि—म्हाळसा महात्म्यांत खंडेरावानें—जेजूरीच्या खंडोबानें मणि-

मल्ल दैत्याचा नाश करून त्याचे येळकोट ह्मणजे सातकोटी लोक मारून आपलें वर्चस्व स्थापन केलें. हा खंडेराव इ. स. ६२० त होऊन गेला. मणिमल्ल दैत्य ही संज्ञा ज्यास दिली आहे तो बौद्धधर्मानुयायी कोणी तरी प्रबळ राजा असावा. त्याचा पाडाव करून खंडेरावानें वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन होण्यास मदत केली असावी. हिंदुस्तानच्या दक्षिण भागांत खंडेरावानें आपल्या शौर्यानें व पराक्रमानें आणि आद्य शंकराचार्यांनीं आपल्या विद्वत्तेनें पुनः वैदिक सनातन धर्माची स्थापना केली असें मानण्यास पुष्कळ आधार आहे. यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं इसवी सनापूर्वीं दोनशें वर्षें बौद्धधर्माचा महाराष्ट्रांत उत्कर्ष होण्यास प्रारंभ झाला व त्याचा पूर्ण ऱ्हास खंडेरावाच्या वेळीं ह्मणजे जवळ जवळ हजार वर्षांनीं झाला असें अनुमान निघतें. त्यांत विशेष उत्कर्षाच्या काळीं बौद्ध धर्मानुयायी राजांच्या मदतीनें लेण्यासारखीं कृत्यें झालीं असलीं पाहिजेत हें उघड आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां एकंदरींत असें दिसतें कीं, घेडवाडा, सुतारझोंपडी, तीन ताळ हीं लेणीं निदान दोन हजार वर्षांपूर्वींचीं आहेत. युरोपियन पंडितांचेंही मत असेंच आहे.*

---

* रा. ए. सो. जर्नल, जानेवारी १८५३ पा. ३७४.

# उपसंहार.

"इंग्लिशांसारख्या सत्ताधीश, उदार आणि शास्त्रीय ज्ञानाच्या भोक्त्या राजकर्त्यांनीं अशा प्रकारच्या लेण्यांसारख्या प्रचंड कृत्यांस कोणत्याही रीतीनें उपद्रव पोंचणार नाहीं अशीं तजवीज केली पाहिजे. हें काम विशेष खर्च न करितां व थोड्या श्रमानें सहज होण्यासारखें आहे. इंग्रजांनीं जर ही खबरदारी घेतली नाहीं तर मुसलमानांपेक्षांही आपण जास्त रानटी आहों असें होईल. कारण आह्मी जेव्हां खेद प्रदर्शित करितों तेव्हां फार लांब लांब बाता ठोकीत असतों. बलाढ्य लोकांनीं पूर्वीं बांधिलेल्या प्राचीन इमारतींबद्दल पूज्य बुद्धि दर्शविण्याचा जर आह्मी आव घालतों, तर त्या इमारती मूळ स्थितींत कायम राहतील व त्यांचें सौंदर्य कमी होणार नाहीं, अशा स्थितींत त्यांचें संरक्षण करणें हें आमचें कर्तव्य आहे. कारण या इमारती पाहून त्यांची नुसती वाहवा करण्यापेक्षां अथवा कौतुक मानण्यापेक्षां त्या जतन होतील अशी जर तजवीज केली, तर आह्मांस जास्त भूषणावह होईल. तेव्हां या विषयाकडे इंग्रज राज्यकर्त्यांनीं लक्ष्य पुरवावें अशी विनंती आहे." इ. स. १८२४ मध्यें 'वेरूळचे चमत्कार' या नांवाचें पुस्तक कॅप्टन सिली या साहेबांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्यांत वरील उताऱ्यांत नमूद केलेला मजकूर आहे.

या कॅप्टन साहेबांनीं आपल्या जातभाई राज्यकर्त्यांस केलेली विनंती फुकट गेली नाहीं. या कामीं त्यांनीं जी कामगिरी बजाविली आहे व परिश्रम घेतले आहेत, त्याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत. आमच्या प्राचीन इतिहासाचा शोध लावण्याच्या कामीं, प्राचीन नाणीं गोळा करण्याच्या उद्योगांत व प्राचीन इमारती सुव्यवस्थित राखण्याचे कामीं उदार मनाच्या व जिज्ञासु इंग्रजांनीं खरोखर फार प्रयत्न केले आहेत. याच कामासाठीं केवळ, हिंदुस्थान सरकारनें एक स्वतंत्र खातें स्थापन केलें असून त्या खात्याच्या शाखा हिंदुस्थानच्या निरनिराळ्या

---

१ Wonders of Elora by Captain Seely.

भागांतही आहेत. या खात्यास 'आर्केआलजी' असें ह्मणतात. अजिंठ्याच्या लेण्यांतील चित्रांचे नमुने काढून आणण्याचें काम इ. स. १८७२ सालीं एका इंग्रज गृहस्थाच्या सूचनेवरून सुरू झालें व डा० बर्जेसच्या विनंतीवरून एलिफंटा येथील लेणीं दुरुस्त ठेवण्यासाठीं मुंबई सरकारानें दरसाल पन्नास रुपयांची मंजुरी दिली[1]. हिंदुस्थानांतील प्राचीन इमारती, देवालयें, स्तंभ इत्यादि जशाचे तसे कायम रहावे, ते मोडकळीस आले असल्यास त्यांची योग्य वेळीं दुरुस्ती करावी, जुन्या इमारतींस लोकांकडून किंवा इतर सरकारी अधिकाऱ्यांकडून इजा पोंचणार नाहीं अशी व्यवस्था ठेवावी व जुन्या स्थळांविषयीं माहिती मिळवून ती प्रसिद्ध करावी असा या आर्केआलजीच्या ह्मणजे प्राचीनवस्तुविज्ञानखात्याचा हेतु आहे.

सरकारचें हें नवीन खातें अस्तित्वांत आल्यामुळें जुन्या इमारतींस ऊर्जितावस्था प्राप्त झाली आहे हें उघड आहे. वेरूळचीं लेणीं जगविख्यात असल्यामुळें त्यांजकडे पुष्कळ दिवसांपूर्वीं शोधकांचें लक्ष गेलें आहे हें खरें आहे. हल्लींच्या निजामसाहेबांचेंही या कामीं विशेष लक्ष आहे हें लेण्यांच्या सांप्रतच्या सुस्थितीवरून उघड होतें. तथापि त्या संबंधानें आमच्या नजरेस आलेली एक गोष्ट या शास्त्रीय दृष्टीनें पाहणाऱ्या अंमलदारांपुढें मांडणें आमचें कर्तव्य आहे. कैलासाच्या अलीकडचीं जीं जुनीं बौद्धांचीं लेणीं आहेत त्या लेण्यांवरून गाडीरस्ता जातो. वरून गाड्या उतारावर घडघड चालल्या असतां आंत लेण्यांत हादरल्यासारखें होतें. गाड्यांच्या वर्दळीनें लेण्यांस यत्किंचित् जरी इजा पोंचण्याचा संभव असला तर गाडीरस्ता दुसरीकडून काढणें जरूर आहे. या कामीं आर्केआलजीखात्याचे अधिकारी लक्ष घालून कांहीं फेरफार करणें इष्ट असल्यास ते निजाम सरकारच्या नजरेस आणितील अशी विनंती आहे. कारण जुन्या काळाचीं द्योतक अशीं हीं चिरस्मरणीय स्मारकें जशाचीं तशीं कायम राहतील हें पाहणें व त्याबद्दल तजवीज करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

---

१ इं० आन्टिक्वारी वर्ष १८७२.

जुन्या इमारती प्रचीन काळच्या वैभवाचीं स्मारकें होत. त्यांच्या योगानें आपणांस पूर्व स्थितीची आठवण होते व महत्वाकांक्षी माणसांच्या अंतःकरणांत त्या वैभवशालीपणाचें आपणांसही वांटेकरी होतां यावें अशी प्रेरणा होते. एवढें महत्कार्य बजावणारीं कृत्यें पाहून त्यांचें अल्प वर्णन मराठी वाचकांच्या माहितीकरितां देण्याची स्फूर्ति ज्यानें दिली त्या दयाघन जगदीशास नमन करून या पुस्तकाच्या वाचनानें वाचकांस लेणीं पाहण्याची इच्छा उपन्न होवो, अशी आशा प्रगट करून हें प्रकरण संपवितों.



# देवगडचा किल्ला.

वेरूळच्या रस्त्यावर हा इतिहासप्रसिद्ध किल्ला आहे. तो डोंगरी असून फार मजबूत आहे. इंग्रजांचें साम्राज्य या देशांत स्थापन होण्यापूर्वी हा किल्ला सर्वांस पाहण्यास सांपडत नसे. हल्लीं सर्वत्र शांतता असल्यामुळें व देवगडच्या किल्ल्यांत शिबंदी वगैरे कांहीं नसल्यामुळें औरंगाबाद येथील अधिकाऱ्यांची परवानगी मिळविल्यावर आंत जाण्यास मनाई होत नाहीं. हा किल्ला राष्ट्रकूट वंशांतील राजे या प्रांतांत राज्य करीत असतां त्यांनीं इ. स. ४०० चे सुमारास खोदविला. या राज्यकर्त्यांच्या नांवावरूनच त्यांच्या अमलाखालीं राहणाऱ्या प्रजेस मराठा हें नांव मिळालें. भाषाशास्त्रवेत्ते मराठा शब्दाची व्युत्पत्ति अशी देतात कीं, राष्ट्रकूट यापासून महाराष्ट्रकूट हा शब्द झाला व त्याचा अपभ्रंश मराठा हा शब्द होय. इ. स. १२९४ पर्यंत देवगड किल्ला राष्ट्रकूट वंशांतील राज्यकर्त्यांच्या ताब्यांत होता. ज्ञानेश्वर महाराजांनीं आपला ज्ञानेश्वरी नांवाचा प्रख्यात ग्रंथ जेव्हां समाप्त केला, तेव्हां रामचंद्रराव जाधव हा यादव कुळांतला राजा देवगिरी अगर देवगड येथें राज्य करीत होता, असा त्या ग्रंथाचे शेवटीं उल्लेख केला आहे.

ह्या किल्ल्याभोंवतीं पुष्कळ रणें माजून राहिलीं होतीं. इतिहासांत त्याचा वारंवार उल्लेख आलेला आहे. तेव्हां त्याचा प्राचीन इतिहास थोडक्यांत देण्याचा येथें प्रयत्न केल्यास तो वाचकांस रुचणार नाहीं, अशी फारशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. म्हैसूर प्रांतांत द्वारावतीपूर अथवा घोरसमुद्र ही पूर्वी यादव राजांची दक्षिणेंतील राजधानी होती. यादव कुळांतील भिल्लम नांवाच्या प्रसिद्ध योद्ध्यानें ११८७ त देवगिरी हें आपलें राजधानीचें शहर केलें, व आपल्या राज्याचा विस्तार माळव्यापर्यंत केला. १२७१ त रामचंद्रराव यादव देवगडास गादीवर होता. १२९० त जलालुद्दीन खिलजी यानें दिल्लीस खिलजी घराणें स्थापन केलें. जलालुद्दीनाचा अल्लाउद्दीन नांवाचा पुतण्या आणि जांवई होता. तो एका प्रांताचा सुभेदार होता व स्वभावानें अत्यंत महत्वाकांक्षी होता. स्वतंत्र राज्य

स्थापन करण्याच्या हेतूनें त्यानें १२९४ त दक्षिणेवर स्वारी केली. ह्या काळपावेतों मुसलमानांचे पाय दक्षिणेस लागले नव्हते. अल्लाउद्दीन जेव्हां देवगडावर स्वारी करून आला, तेव्हां राजाचा मुलगा देवगडाहून बरेंच सैन्य बरोबर घेऊन यात्रेला गेला होता. अशी संधि साधून अल्लाउद्दीनानें हल्ला केला व त्यांत राजाच्या सैन्याचा पराभव झाला. अल्लानें आपल्याला मागाहून आणखी वीस हजार सैन्याची कुमक येत आहे अशी थाप मारल्यामुळें राजानें घाबरून त्याच्याशीं तह केला. ही हल्ल्याची व तहाची बातमी मध्यंतरीं राजपुत्र शंकरदेवाला लागल्यावरून तो जलदीनें परत आला व राजाच्या सांगण्यास न जुमानतां त्यानें मुसलमानांच्या सैन्यावर अगदीं निकरानें हल्ला केला. त्यांत मुसलमानांचा पराभव होण्याची वेळ आली होती, परंतु किल्ल्यावर नजर ठेवण्यास एका बाजूस ठेवलेलें एक हजार सैन्य ऐन वेळेवर मुसलमानांच्या मदतीला येऊन पोंचल्यामुळें शत्रूचें वीस हजार सैन्य त्याच्या मदतीला येऊन थडकलें, आतां आपला टिकाव लागणें व आपणांस जय मिळणें कठीण, असें शंकरदेवाच्या सैन्यास वाटून सैन्यांतील लोकांनीं पळ काढला. आपला विजय झाल्यामुळें अल्लाउद्दीनानें पूर्वीपेक्षां दसपटीनें जास्त ह्मणजे सहाशें मण सोनें, सातमण मोत्यें, दोन मण हिरे माणकें, एक हजार मण चांदी व एक हजार रेशमी कपडा आणि इलिचपूर प्रांताचा दरसालचा वसूल अशी खंडणी बसविली. अल्लाउद्दीनानें पुढें आपल्या चुलत्यास ठार मारून दिल्लीचें राज्य बळकाविलें. त्यामुळें तेथें बराच घोंटाळा माजून राहिला होता. ती संधि साधून दरसाल खंडणी पाठविण्याचे कामीं रामदेवानें कानाडोळा केला. त्यावरून अल्लानें पुनः देवगडावर सैन्य पाठवून रामदेवास कैद करून दिल्लीस नेलें. सुलतान अल्लाउद्दीनानें त्याचा मोठा सत्कार केला व त्यास परत देवगडास पाठविलें. पुढें मुसलमानांनीं दक्षिणेवर ज्या एक दोन स्वाऱ्या केल्या त्यांत देवगडच्या दक्षिणेचा प्रांत काबीज करण्याचें कामीं रामदेवानें त्यांस बरीच मदत केली. सन १३१८ त देवगडास हरपालदेव, रामदेवाचा जांवई राज्य करीत होता. अल्लाउद्दीन

मेला असें पाहून दिल्लीच्या बादशहाचें वर्चस्व त्यानें झुगारून दिलें होतें. पण दिल्लीस तक्ताधिपति झालेल्या कुतुबुद्दीन मुबारकशहानें देवगडावर स्वारी करून तो हस्तगत केला आणि हरपालदेवास क्रूरपणानें जीवें मारिलें. याप्रमाणें देवगडचें यादव राजांचें घराणें नष्ट झालें.

कुतुबुद्दीन मुबारकशहानें देवगड येथें राहून किल्ल्यांतील मोठी मशीद बांधली. ती अझून किल्ल्यांत आहे. दक्षिणेंत मुसलमानी धर्म स्थापन केल्याचें स्मारक ही इमारत आहे. त्या जागेवरच अगर जवळच असलेल्या हिंदूंच्या देवालयाचे खांब या इमारतीस लाविले आहेत हें त्यांच्या आकारावरून स्पष्ट दिसतें. इ. स. १३२१ त महमद बिन तघलख हा देवगडास येऊन त्यानें वारंगुळावर हल्ला केला. दोन वर्षें देवगडास राहून त्यानें बेदर आणि वारंगूळ हीं शहरें घेतलीं, व वारंगुळास सुलतानपूर हें नांव दिलें. सन १३२५ त हा महमद दिल्लीच्या तक्तावर बसला. त्यानें देवगडास दौलताबाद हें नांव देऊन ती आपली राजधानी केल्याचें जाहीर केलें व दिल्लींतील सर्व रहिवाशांस दौलताबादेस जाण्याचा हुकूम केला. या हुकुमाचा असा परिणाम झाला कीं, दिल्लींत एकही माणूस राहिलें नाहीं, सर्व शहर ओसाड पडलें. इब्न बतूत या इतिहासकारानें या संबंधानें असें वर्णन केलें आहे कीं, “ सुलतानानें शहर सोडण्यास सर्वांस हुकूम केला. लोक विनाकारण उशीर लावताहेत असें पाहून त्यानें असा हुकूम केला कीं, जो कोणी ताबडतोब घर सोडणार नाहीं त्यास शिक्षा करण्यांत येईल. सर्व लोक गेले पण एक आंधळा माणूस राहिला होता त्यास पायाला धरून फरफटीत ओढून नेण्याचा सुलतानानें हुकूम केला. सुलतानाच्या हुकमाप्रमाणें त्याला ओढीत नेलें. वाटेंत त्याचा एकेक अवयव गळत जाऊन शेवटीं त्याची एक तंगडी मात्र राहिली. ती आणून दौलताबादेंत फेंकून देण्यांत आली!” या महमदाच्या मूर्खपणाच्या पुष्कळ गोष्टी आहेत. त्यांपैकीं बिडास त्यानें आपल्या दांतावर एक मोठी कबर बांधली ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. १३४४ त महमदाची स्वारी पुनः दिल्लीस

१ ईस्ट अॅन्ड वेस्ट, अंक जून १९०५, पान ५८२.

परतला आणि ज्यांची इच्छा असेल त्यांनीं पुनः दिल्लीस परत जावें, असा आपल्या प्रजेस त्यानें हुकूम फर्माविला.

यानंतर दक्षिणेंत बऱ्याच उलाढाली झाल्या. हसनगांगूनें बाहमनशाही स्थापन केली. त्यानें गुलबर्गा आपल्या राजधानीचें शहर करून दौलताबादेस सुभेदार नेमिला. यापुढील सर्व काळ आपसांत लढाया करण्यांत आणि भोंवतालचे हिंदु राजे पादाक्रांत करण्यांत मुसलमानांनीं घालविला. १४७१ मध्यें ज्यानें पुढें विजापुरास आदिलशाही स्थापन केली तो दौलताबादचा सुभेदार होता. १६०७ त दौलताबाद निजामशाहीचें राजधानी झालें. या वेळेस इतिहासांतील एक प्रसिद्ध पुरुष उदयास आला त्याचें नांव मलिकंबर होय. जहांगीर बादशहानें "काळतोंड्या अंबर हा मोठा भयंकर शत्रु आहे, असा वेळोवेळीं त्याचा उल्लेख केला आहे. त्यानें खडकी ऊर्फ औरंगाबाद हें आपलें मुख्य ठाणें केलें. जहांगिरानें १६१२ त दोन सैन्यें निरनिराळ्या मार्गांनीं दौलताबादेवर पाठविलीं. पण मलिकंबरनें त्यांचा पराभव केला. मलिकंबर हा मोठा नामांकित माणूस होऊन गेला. "हबशी गुलाम एवढ्या मोठ्या पदास पोंचल्याचें इतिहासांत दुसरें उदाहरण नाहीं" असें जहांगीरनें त्याजविषयीं लिहून ठेविलें आहे. मलिकंबरनंतर त्याच्या फत्तेखान नांवाच्या मुलानें शहाजीच्या जहागिरीचीं गांवें परत घेतलीं ह्मणून तीं परत मिळण्यासाठीं १६३२ त शहाजीनें दौलताबादेवर स्वारी केली. पण फत्तेखानास दिल्लीच्या बादशाहाकडून मदत मिळाल्यामुळें शहाजीस यश आलें नाहीं, व त्याची मोहीम व्यर्थ गेली. इ. स. १७२४ मध्यें हा किल्ला निजामाच्या ताब्यांत गेला. पुढें मराठ्यांनीं जेव्हां स्वराज्याची स्थापना केली, तेव्हां तो पुनः मिळविला व नंतर कांहीं कारणांनीं पुनः निजामास दिला. तेव्हांपासून आजतागाईत तो निजामसरकारच्याच ताब्यांत आहे. मध्यंतरीं १७५८ त एम्. बुसी ह्या फ्रेंच गव्हर्नराच्या ताब्यांतही कांहीं दिवस होता. याप्रमाणें या किल्ल्याची त्रोटक ऐतिहासिक माहिती आहे.

देवगड हा किल्ला डोंगरी असून डोंगराच्या मुळक्याचा बनविला आहे. जिकडून वर चढण्यास मार्ग आहे ती बाजू सोडून त्याच्या बाकीच्या सर्व बाजू मुळींच चढतां न येण्यासारख्या सरळ आहेत. किल्याला एकंदर चार कोट आहेत. त्यांपैकीं एकाचें नांव अंबरकोट, दुसऱ्याचें नांव महाकोट व तिसऱ्याचें नांव बालाकोट. सगळे कोट अझूनपर्यंत कायम आहेत. या कोटांचा पाडाव करीत शत्रूंना आपला आंत शिरकाव करून घेणें हें महत्प्रयासाचें किंबहुना दुर्घट कृत्य आहे. असें असतांही तो शत्रूंच्या हस्तगत कसा झाला असावा याबद्दल आश्चर्य वाटतें. आमचे लोक शौर्यांत अगर लढवय्येपणांत कमी आहेत असें नाहीं. मग अजिंक्य गणले गेलेले किल्ले शत्रूंनीं पादाक्रांत केले कसे? हा प्रश्न साहजिकपणें उद्भवतो. त्याला उत्तर कॅपटन सिली नांवाच्या एका निःपक्षपाती इंग्रजानें दिलें आहे तें येथें देतों. "हिंदु आणि मुसलमानांपेक्षां ज्यास्त शूर लोक पृथ्वीवर नाहींत याबद्दल प्रश्न नाहीं. परंतु परस्परांनीं एकमेकांस जितकें साह्य करावयास पाहिजे तितकें ते करीत नाहींत ही त्यांच्यांत गोम आहे. आणि आह्मी जरी बहुधा स्वतःच्या बाहुबलावर अवलंबून असतों, आणि प्रत्येक राजाशीं आणि आमच्याशीं विरोध करणाऱ्या पक्षाशीं आह्मी जरी सरळपणानें वागतों, तरी लांचलुचपत व त्याच प्रकारचे अन्यमार्गाचें अवलंबन करूनही आह्मीं बराच फायदा करून घेतला आहे. माझ्या मतानें हिंदुमुसलमानांस दुसरें एक विघातक कारण त्यांची अनेक बायका करण्याची चाल व रंडीबाजी हें होय. तुमचे किल्ले कितीही मजबूत असोत किंवा अजिंक्य मानिलेले असोत, जर किल्याच्या आंत विश्वासघात हा संवचोर, ह्मणजे गोड बोलून गळेकापू, शिरलेला असला तर त्या अजिंक्यपणाचा काय पाड?" या प्रदर्शित केलेल्या मताचा हल्लींचे राजेरजवाडे विचार करोत किंवा न करोत नवीन नवीन सार्वजनिक संस्था स्थापून राष्ट्रोन्नति करूं इच्छिणाऱ्या सुशिक्षित हिंदुमुसलमानांनीं ते नेहमीं लक्ष्यांत ठेवावयास पाहिजेत.

असो. किल्ला ज्यानें बांधिला, त्या राजापासून त्याचे शेंकडों धनी होऊन गेले. त्यांत हिंदु होते, मुसलमान होते आणि फ्रेंचही होते. एक

गेला व दुसरा आला म्हणून किल्ल्यानें कधीं शोक केला नाहीं, अथवा कोणाचें सुतक पाळलें नाहीं अथवा महोत्सवही केला नाहीं! सर्वांना "आवो जावो घर तुमारा" असें त्यानें आपलें वर्तन ठेविलें आहे. त्याच्या पायीं लढाया झाल्या व रक्ताचे पूर वाहिले याबद्दल कदाचित् त्यास हळहळ वाटत असल्यास न जाणों! आमच्यासारख्या जड अचेतन वस्तूंसाठीं हे परमेश्वरा, तुझीं लेंकरें आपसांत कलह माजवितात व विनाकारण रक्तपात करितात तेव्हां त्यांस या खुळेपणापासून पराङ्मुख कर, अशी सर्व किल्ल्यांनीं सर्व चराचर विश्वाच्या निर्माणकर्त्या परमेश्वराजवळ करुणा भाकिली असावी व त्यांचें केविलवाणें गाऱ्हाणें दयाघन परमेश्वरानें ऐकून सर्वत्र शांतता राखण्यासाठीं इंग्रज प्रभूस या देशावर राज्य करण्याची सनद दिली! देवगड हा किल्ला फार प्रसिद्ध असल्यामुळें व त्याच्या भोंवतालचा प्रदेश सुपीक असल्याकारणानें व हवापाणीही सुरेख असल्यानें देवगड पूर्वीं राजधानीचें शहर होतें. या स्थळाला मोहित होऊन महमदानें दिल्ली हें राजधानीचें शहर सोडून देवगड आपली राजधानी करण्याचा प्रयत्न केला होता व त्याप्रमाणें त्यानें कांहीं दिवस येथें राजधानीही केली होती याचा उल्लेख वर आलेला आहेच.

इतिहासांत जें ठिकाण इतकें नांवाजलेलें आहे तेथें हल्लीं निदान मोठें शहर तरी असावें, असें वाचकांस साहजिकपणें वाटेल; परंतु वस्तुस्थिति फार निराळी आहे. ज्या देवगडच्या संपत्तीची ख्याति ऐकून ती लुटून नेण्या-करितां मोंगलांनीं त्यावर स्वारी केली व इतरांनींही स्वाऱ्या केल्या व तेथील अपार संपत्ति लुटून नेली, त्या शहराची आतां काय दुर्दशा झाली आहे! तेथें शहर नसून किल्ल्यापासून सुमारें एका मैलाच्या अंतरावर एक लहानसें खेडें आहे. पूर्वींच्या शहराचा कोट मात्र अझून कांहीं ठिकाणीं शाबूद आहे त्यावरून त्याच्या मोठ्या विस्ताराची कल्पना होते. ज्या ठिकाणीं कदा-चित् राजवाडे असतील, मोठमोठ्या सरदारांचे वाडे असतील, गजशाळा, अश्वशाळा असतील अगर सुंदर आणि रमणीय बागबगीचे असतील तेथें हल्लीं चोहोंकडे गवत वाढलेलें मैदान दिसतें!! मधून मधून मशि-

र्दीचा मोडका भाग व पूर्वीच्या इमारतींची साक्ष देणारे दगडमाती हे दृग्गोचर होतात! याच ठिकाणीं मलिकंबरानें आपलें नांव चिरकाल रहावें ह्मणून एक मोठी मशीद बांधून आपली तेथें कबर करवून ठेविली होती. परंतु या मैदानांत त्या मशिदीचा हल्लीं पत्ताही लागत नाहीं! कालमहिमा विलक्षण आहे. त्याला रावापासून रंकापर्यंत सर्वांनीं नमन केलें पाहिजे. त्याचा अंमल कोणी मानोत अगर न मानोत तो आपली सत्ता अबाधित चालवीत आहे.

असो. आतां आपण किल्ल्याकडे वळूं. किल्ल्याच्या दरवाजासमोरून वेरूळला वाट जाते. जातांना सडकेच्या उजव्या बाजूला एक लहानशी धर्मशाळा आहे. किल्ल्यासमोर जीं झाडें आहेत त्यांला पार बांधलेले आहेत, त्यामुळें प्रवाशास थोडी विश्रांति घेण्यास जागेची सोय आहे. जवळच एक विहीर आहे. तिचें पाणी पिण्यासारखें आहे. किल्ल्यांत शिरतांना मनांत अनेक विचार उभे राहतात, परंतु ते आतां बाजूस सारून आपण किल्ल्यांत शिरूं. किल्ल्याच्या पहिल्या दरवाजावर निजाम सरकारांनीं पाहरेकरी ठेविले आहेत; त्यांस औरंगाबादेहून आणिलेला परवाना दाखविला ह्मणजे ते आंत जाऊं देतात. आंत जाणारांपाशीं असलेल्या छत्र्या व काठ्या व आगपेट्या देवडीवाल्याजवळ ठेवाव्या लागतात. किल्ल्याचे पहिले दोन तट अगदीं जवळ जवळ आहेत. पहिला तट ह्मणजे नुसती भिंत आहे. दुसऱ्या तटास बुरूज आहेत. एक तट डोंगराच्या आंगचाच खोदलेला आहे. त्याचे आंत खोल खंदक असून त्यांत नेहमीं पाणी असतें. दुसऱ्या दरवाजाच्या आंतल्या दोन्ही बाजूंस दोन दगडी हत्ती आहेत. येथून जवळच एक दीपमाळेसारखा लहानसा बुरूज आहे. त्यावर जनार्दनस्वामींच्या समाधीचे दर्शनास जाणारे लोक कापूर जाळीत असत असें ह्मणतात. येथून पुढें थोड्या अंतरावर जातांना उजव्या हाताला तोफा ठेवण्याची जागा आहे.

येथवर आलें ह्मणजे पटांगण लागतें. या खुल्या जागेंत डाव्या हाताला सुलतान अल्लाउद्दीन बहिमन यानें बांधिलेला उंच मनोरा आहे. त्याला चांद मिनार ह्मणतात. या मनोऱ्याचें काम सुंदर असून तो एका कालीं निरनिराळ्या चित्रविचित्र रंगांनीं सुशोभित केलेला असावा. त्या वेळीं तो फार कमनीय असला पाहिजे. या मनोऱ्याला कोणी वेधशाळाही ह्मणतात. वर चढण्यास त्याला आंतून पायऱ्या आहेत, व आंत उजेड पडावा ह्मणून ठिकठिकाणीं लहान लहान खिडक्या ठेविल्या आहेत. या वेधशाळेच्या समोर रस्त्याच्या पलीकडच्या बाजूस एक मोठा हौद आहे. त्यास हत्तीहौद ह्मणतात. त्यांत उतरण्यास चारी बाजूंनीं पायऱ्या आहेत, व वर भोंवतीं फिरण्यास प्रशस्त फरसबंदी आहे. या हौदाजवळ हल्लीं मशीद मानलेली एक इमारत आहे. ती कुतुबुद्दीन मुबारक बादशहानें बांधली आहे. तिला मशिदीचें रूप येण्यापूर्वीं तिचा पेहराव निराळा असावा. ती हिंदूची अगर बौद्धाची मुसलमानीण झाली असावी असें स्पष्ट दिसून येतें. बहुतकरून पूर्वीं ह्या मशिदीच्या ठिकाणीं बौद्धांचें देऊळ असावें व मध्यभागीं इमारतींत जो कोनाडा आहे तेथें कांहीं तरी मूर्ति असावी. शिवाय कांहीं ठिकाणीं पूर्वींच्या इमारतीचे दगड पालथे बसवून उपयोगांत आणिले आहेत. त्या दगडांवर कांहीं मूर्ती वगैरे कोरिलेल्या असाव्या असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या भागांवरून अनुमान बांधितां येतें. या मशिदीसमोर मोठें पटांगण असून त्याला सभोंवार भिंती आहेत. या इमारतींच्या अवलोकनानें प्राचीनवस्तुशास्त्रवेत्त्यांना कदाचित् महत्वाची माहिती मिळण्याचा संभव आहे.

या मशिदीच्या बाहेर पडल्यावर किल्ल्याकडे वर जातांना एक मोडकळीस आलेलें हेमाडपंती देऊळ आहे. पुढें जो दरवाजा लागतो तो पूर्वाभिमुख असून त्याला दिंडी आहे. दरवाजाबाहेर पाहरा असतो. या दरवाजाला काळा कोट दरवाजा ह्मणतात. या दरवाज्यांतून आंत शिरल्यावर धान्य वगैरे सांठविण्याचीं कोठारें आहेत. आमच्या वाटाड्यानें त्यांपैकीं एकांतून तंबाखू ह्मणून काढून दाखविली. तिला तंबाखूचा

बिलकुल गंध नव्हता. तिला बहुतेक मातीचें रूप आलें होतें. पत्तीच्या घड्यावर घड्या मात्र दिसत असल्यामुळें ती तंबाखू असावी असें वाटलें. कोठारांत सांठविलेलें सामान रामदेवराव जाधवाच्या वेळचें आहे असें सांगतात. तूप, धान्य वगैरे इतर सांठवून ठेविलेलें सामान सर्व नासून गेलें आहे. दारूगोळा मात्र चांगल्या स्थितींत आहे असें ह्मणतात. यानंतर जो दरवाजा लागतो तो दक्षिणाभिमुख आहे. त्याच्या समोर ओवऱ्या आहेत, व जवळच मोडकळीस आलेल्या कांहीं इमारती आहेत. अवरंगजेबानें संभाजीस दुष्टपणानें ठार मारिल्यावर त्याच्या बायकोस व मुलास या इमारतींपैकीं उजव्या हाताच्या चिनीमहाल नांवाच्या एका इमारतींत कैदेंत ठेविलें होतें. पुढें एका लहान बुरुजावर मेंढा नांवाची तोफ आहे. तिच्यावर "महंमद औरंगजेब बादशहागाझी" हीं अक्षरें आहेत. या तोफेच्या जागेपासून थोडेंसें उतरून जावें लागतें. उतरण्यास पायऱ्या आहेत. त्या उतरून गेलें असतां खंदक लागतो, तो चाळीस हात रुंद आणि तीस हात खोल आहे. या खंदकावरून पलीकडे जाण्यास एक पूल आहे. पुढें वीस पायऱ्या चढून गेल्यावर उघडी जागा लागते.

यानंतर वर चढतांना एक लहान दार लागतें. पुढें वर चढण्यास डोंगराच्या पोटांतून मार्ग काढिलेला आहे. त्याला मोठी अंधारी अथवा मशालके बंगला हें नांव आहे. येथून जातांना मशाली पेटवून वर जावें लागतें. या अंधारबोळांत कांहीं सपाटी आहे, कांहीं पायऱ्या चढाव्या लागतात व कांहीं उतरावें लागतें. एके ठिकाणीं कोंपऱ्यांत एक भुयारासारखी जागा आहे. तेथें 'दुष्मनला' ढकलून द्यावें ह्मणजे त्याचा मागमूस राहत नाहीं असें आमच्या वाटाड्यानें सांगितलें. हे मशालजी वाटाडे कदीमात ह्मणजे वंशपरंपरा किल्ला दाखविण्याचें काम करणारे आहेत. हा अंधारबोळ चढून गेल्यावर बाहेर पडण्याचें दार आहे त्याला तवा ह्मणतात. या दारावर बरोबर बसेल असा लोखंडी पत्रा तेथें पडला आहे. यदाकदाचित शत्रूचा किल्ल्यांत शिरकाव झाला, तर त्याला या अंधारबोळांतून वर चढणें

दुष्कर व्हावें ह्मणून येथें अजब योजना केली आहे. शत्रु आतां अंधारबोळांत शिरणार असें वाटतांच या दारावर तवा टाकून सरपण कोळसे त्यावर रचून ते पेटवून द्यावयाचे. पेट घेण्यास अवकाश लागूं नये ह्मणून डोंगराच्या जवळच्या भागाला एक खिंडार पाडलेलें आहे. वारा एके ठिकाणीं होऊन मोठ्या सोसाट्यानें या खिंडारांतून तव्याकडे भात्यासारखा वाहतो. त्यावरूनच या खिंडारास भाता हें नांव पडलें आहे. वरून वाऱ्याचा विलक्षण जोर असल्यामुळें तव्यास असलेल्या छिद्रांतून धुराचा सर्व लोट आंत खालच्या बाजूस बोळांत शिरतो. आणि त्यामुळें मनुष्यास एक क्षणभर सुद्धां तेथें जीव घाबरल्यावांचून राहवावयाचें नाहीं हें उघड आहे !

तव्यांतून बाहेर पडल्यावर त्र्यायशीं पायऱ्या चढून गेलें ह्मणजे आणखी एक दरवाजा लागतो. दरवाजाजवळ एक नवसाची तोफ आहे. येथें एक गणपतीचें देऊळ होतें. पण बिचारा गणपति पदच्युत झालेला असून त्याची गादी एका पिरानें बळकाविली आहे ! येथेंच उजव्या हाताला एक टाकें आहे. त्याला कवडीटाकें हें नांव आहे. आकाश अभ्राच्छादित असलें आणि इतर ठिकाणीं जर चंद्र दिसला नाहीं, तर येथें चंद्र दिसतो आणि मग हैदराबादेस तारीख कळवितात इतकें या टाक्याचें मुसलमानांस महत्व आहे. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध साधुश्रेष्ठ एकनाथमहाराजांचे गुरु जनार्दनस्वामी यांची समाधि या किल्ल्यांत आहे अशी लोकांची समजूत आहे. या समाधीच्या दर्शनाला दर एकादशीस बरेच लोक येतात. त्या दिवशीं किल्ल्यांत जाण्यास परवानगीची जरूर लागत नाहीं. स्वामींच्या समाधीला जातांना पाण्यांतून जावें लागतें. हें पाणी पावसाचें सांचलेलें असतें. परंतु तें कधीं आटत नाहीं. लोकांचा जाण्यायेण्याचा मार्ग त्यांतून असल्यामुळें तें अगदीं गढूळ असतें हें उघड आहे. पाण्यांतून दहा पंधरा पावलें आंतल्या बाजूस गेल्यावर एक भोंकसें लागतें. या भोंकस्यांतून आंत उतरून समाधीचें दर्शन घ्यावें लागतें. सडपातळ

शरीरयष्टीच्या माणसांस हें कृत्य कठीण वाटत नाहीं. पण स्थूल माणसानें आडवें होऊन आंत शिरण्याची खबरदारी घेतली नाहीं तर धड पुढें ना मागें असें होऊन सोबतच्या मंडळींत हंशा पिकतो! समाधीची जागा लहान खोलीवजा असून डोंगराच्या पोटांत पोखरलेली आहे. येथें अंधेर असल्यामुळें अंधारबोळाप्रमाणेंच मशाली पेटवाव्या लागतात तेव्हां आंतील भाग दिसतो. आंत उजव्या हातास कोंपऱ्यांत ओट्यासारखी एक उंच जागा आहे. त्यावर एक लहान तोफेचा गोळा आणून ठेविला आहे. या जागेलाच स्वामींची समाधी ह्मणतात. तिच्या समोर दुसऱ्या कोंपऱ्यांत एक ओटा आहे. तेथें दत्तमहाराज येऊन बसत असें सांगतात. सूर्यप्रकाशाचें नांव येथें नसल्यामुळें व थोडें फार पूजाद्रव्य दर पंधरवड्यास या ठिकाणीं पडत असल्यामुळें झुरळांची समाधीच्या जागेभोंवतीं बरीच विपुलता असते. स्वामींच्या समाधीच्या आणि दत्तमहाराजांच्या बसण्याच्या जागांमध्यें स्वामींची पोथी ठेवण्याची जागा दाखवितात. स्वामींनीं आपल्या सच्छिष्य एकनाथमहाराजांस भागवताच्या एकादश स्कंधावर प्राकृत टीका करण्यास आज्ञा केली, व त्यामुळें एकनाथी भागवत हा अमोल ग्रंथ मराठींत निर्माण झाला. तेव्हां भागवत हा ग्रंथ स्वामींना प्रिय असावा असें दिसतें. किंवा दुसरी एखादी पोथी ते वाचीत असत याबद्दल नक्की माहिती देतां येत नाहीं. कारण जनार्दनस्वामींचा एकही ग्रंथ उपलब्ध नाहीं, अशी सर्वसाधारण समजूत आहे. पण भारद्वाज या नामाभिधानानें वर्तमानपत्रांच्या वाचकांच्या परिचयाचे झालेल्या आमच्या एका विद्वान् शोधक मित्रास स्वामींनीं लिहिलेला एक ग्रंथ गतवर्षी उपलब्ध झाला आहे. या समाधीच्या जागेचें थोडें सूक्ष्मरीतीनें अवलोकन केलें असतां स्वामींची समाधि येथें असावी असें वाटत नाहीं. कारण समाधि ह्मणून जी दाखवितात ती डोंगराचीच पुढें आलेली जागा आहे. स्वामी देवगड किल्ल्याचे ठाणेदार होते. त्या वेळीं किल्ला अहमदनगर येथील निझामबुऱ्हाणुद्दीनच्या ताब्यांत होता. स्वामींचें किल्ल्यांत वास्तव्य असतांना त्यांची एकांत ठिकाणीं समाधि लावून बसण्याची अथवा नामस्मरण करण्याची ही जागा असावी व त्यामुळें स्वामींची

समाधि ह्मणून या जागेला नांव मिळालें असावें. या समाधीच्या जागेच्या वर आणखी बसण्याची जागा असावी असें वाटतें. कारण वरून या जागेच्या डोक्यावर एक झरोक्यासारखें भोंक तोफेजवळून दिसतें.

जनार्दनस्वामींसंबंधीं जितकी माहिती असावी तितकी नाहीं, ही खेदाची गोष्ट आहे. तथापि ते महान् भगवद्भक्त होते अशी संतमंडळांत त्यांची ख्याति आहे. शिवाय एकनाथांनीं आपल्या एकनाथी भागवतांत वारंवार जो त्यांच्या नांवाचा उल्लेख अतिशय पूज्य बुद्धीनें केला आहे, त्यावरून स्वामी हे फारच योग्य पुरुष होऊन गेले असावे यांत संशय नाहीं. ज्यांच्या उपदेशानें नाथासारखा अद्वितीय पुरुष उदयास आला त्या स्वामींची योग्यता खरोखर फार मोठी असली पाहिजे. स्वामी या नांवावरून ते संन्यासी असतीलच असें मानतां येत नाहीं. ते कर्नाटक प्रांतांतील मूळचे राहणारे असल्यामुळें तेथील रिवाजाप्रमाणें जनार्दनस्वामी हें त्यांचें नांव असावें. नाथांनीं प्रगट केलेल्या निस्सीम भक्तीनें व एक-निष्ठपणानें आपले गुरु जनार्दनस्वामी यांचें नांव सर्व मराठी भाषा बोलणारांच्या परिचयाचें केलें. त्यांजविषयीं असावी तितकी विश्वसनीय माहिती लोकांत नसल्यामुळें देवगडच्या किल्ल्यांतच स्वामींची समाधि आहे असें मानण्याचा प्रघात पडला आहे. परंतु ही समजूत अगदीं चुकीची आहे, हें स्वामींचे पट्टशिष्य नाथमहाराज यांच्या लेखी पुराव्यावरून उघड होत आहे. स्वामींच्या समाधीसंबंधानें नाथांनीं पुढें दिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे.

श्रीजनार्दन गुरु । दत्तआज्ञा विचारीत ॥
दत्तआज्ञा वंदुनी शिरीं । तेथुनी निघाले झडकरी ॥
आदिस्थान देवगिरी । मग आले ब्रह्मपुरी ॥
धरिला दक्षिणेचा पंथ । स्वामी आले केदारांत ॥
पूजा केली केदाराची । इच्छा झाली समाधिची ॥
दक्षिणेसी हरिहर । धौम्य ऋषीचा डोंगर ॥
पाहोनियां धौम्यस्थळ । सभोंवतीं ऋषिमंडळ ॥
हरिहराचें पूजन । धौम्य ऋषीचें दर्शन ॥
तेथें घेतली समाधी । एका जनार्दन वंदी ॥

या उताऱ्यावरून स्वामींनीं देवगडच्या किल्ल्यावर समाधी घेतली नसून धौम्यस्थळीं घेतली हें उघड आहे. हें ठिकाण नगर जिल्ह्यांत जामखेड आणि शेवगांव तालुक्यांच्या हद्दीवर आहे. तेथें समाधी असून दरसाल उत्सव होत असतो.

जनार्दनस्वामींची जन्मतिथि व समाधितिथि नाथांच्या पुढील ओंव्यावरून निश्चित करितां येतात. पैठणास नाथांच्या येथें दरसाल फाल्गुन वद्य षष्ठीस मोठा उत्सव होत असतो. नाथही स्वतः याच तिथीस उत्सव करीत असत. ही तिथि ज्याप्रमाणें नाथांच्या समाधीची आहे त्याप्रमाणें स्वामींच्याही समाधीची आहे.

**वद्य षष्ठी फाल्गुन मास । जनार्दनजन्मदिवस ॥**
**दत्तात्रयदर्शनविलास । प्राप्त त्यास तेचि दिनीं ॥**
**आह्मासी जनार्दनाची भेटी । झाली तेव्हां हेचि षष्टि ॥**
**जनार्दन स्वच्छंदगति । याचि दिनीं देहाकृति ॥**
**लोपोनियां सुखस्थिति । निजधामाप्रति पैं गेले ॥**
**पांचवें पर्व याचि दिनीं । पुढें होतां देखसी नयनीं ॥**
**षष्ठि पंचपर्वश्रेणी । विख्यात जनीं भावार्थिया ॥ नाथच. अ. १०**

यावरून जनार्दनस्वामींचा जन्म इ. स. १५०४ मध्यें झाला असावा. व वयाचे ७१ वे वर्षीं ह्मणजे इ. स. १५७५ मध्यें त्यांनीं समाधि घेतली असावी. फाल्गुन वद्य षष्ठी सोमवारीं असून नक्षत्र अनुराधा, योग वज्र आणि वणिज करण असलें ह्मणजे त्या तिथीची मोठ्या पर्वांत गणना आहे. नाथांच्या ह्मणण्याप्रमाणें अशीं पर्वें जेव्हां जेव्हां आलीं त्या वेळीं हे सर्व योग होते. अशा सुयोगावर वर नमूद केलेल्या संस्मरणीय गोष्टी घडून आल्या आहेत. सिवेल आणि दीक्षित यांच्या पंचांगावरून वर नमूद केलेल्या सनामध्यें असे योग आले होते हें सिद्ध होतें व त्यावरून स्वामींचा काळ दिला आहे. देवगड किल्ल्याची माहिती देत असतां त्या किल्ल्यांत ज्या सत्पुरुषाचा कांहीं वर्षें वास घडला व ज्याच्या नांवावर अझून शेंकडों भाविक लोक तेथें त्याच्या मानिलेल्या समाधीचें दर्शन घेण्यासाठीं जातात, त्या स्वामींची उपलब्ध असलेली त्रोटक माहिती येथें दिली असतां विषयां-

तर होणार नाहीं, असें जाणून ती येथें दिली आहे. आतां आपण जनार्दनस्वामी व त्यांचे सच्छिष्य नाथमहाराज यांस भक्तिपूर्वक नमस्कार करून किल्ल्याच्या राहिलेल्या भागाकडे वळूं.

समाधीच्या बाहेर पडल्यावर किल्ल्याच्या राहिलेल्या भागाचें अवलोकन करण्याकरितां पुनः वर चढून जावें लागतें. सोळा पायऱ्या चढून गेलें ह्मणजे बारादरी लागते. १६३६ सालीं शहाजहान बादशहा दौलताबादेस येऊन राहिला होता. तेव्हां त्यानें ही बारादरी बांधली. ही इमारत अगदीं नवीन बांधल्याप्रमाणें चांगल्या स्थितींत आहे. येथवर डोंगर चढून वर आल्याच्या श्रमाचा परिहार येथें शरीरास सुखकारक आणि मनास आल्हाद देणारी वाऱ्याची झुळुक लागली ह्मणजे होतो. या बारादरीला लागूनच एक अष्टपैलू जागा आहे. मध्यभागीं मोठा चौक असून सभोंवार इमारत आहे. चौकाच्या मध्यभागीं एक चिरेबंदी चबुतरा आहे. चारी बाजूंस चार खोल्या आहेत. जागा स्वच्छ आणि रंगविलेली आहे. इमारतीस दाराच्या आकाराएवढ्या मोठ्या खिडक्या आहेत. ह्या खिडक्यांतून आसंमताद्भागचा सुंदर आणि चित्ताकर्षक देखावा फार दूरवर दिसतो. या खिडक्यांच्या खालीं अगदीं सरळ सुळक्यासारखा डोंगराचा भाग आहे. हा डोंगराचा भाग सुमारें एकशेंचाळीस हात उंचीचा अगदीं सरळ आणि गुळगुळित केलेला आहे. तो इतका मऊ आहे कीं मुंगीस अथवा सापास सरपटत वर जाण्याची मुष्कील, तर खालून चढून खिडकीवाटे या बारादरींत मनुष्यानें प्रवेश करीन ह्मणणें ह्मणजे गगनाला हात लावण्याइतकें अशक्य आहे.

बारादरींतून बाहेर पडल्यावर पुनः सरासरी साठ पासष्ट पायऱ्या चढून गेल्यावर डोंगराच्या व त्याबरोबरच किल्ल्याच्या शिखराला आपण जाऊन पोंचतों. किल्ल्याच्या या वरच्या बाजूला बालाकोट हें नांव आहे. या ठिकाणीं वारा फार सोसाट्याचा वहात असतो. येथें एक फार जंगी तोफ ठेविलेली आहे. तीस महाकाळीतोफ ह्मणतात. या तोफेजवळ पूर्वीं एक हौद नेहमीं पाण्यानें भरलेला असे. तोफेस बत्ती लावणाऱ्या माणसाच्या

कानठाळ्या बसूं नयेत ह्मणून त्यास लागलीच पाण्यांत बुडून राहतां यावें या हेतूनें ही योजना केलेली होती. तोफेवर श्रीदुर्गा हीं अक्षरें आहेत व मंगळजी किसनदास सोमजी, रघुनाथ संघजी वैश्य गुजराथी आभनागी असें नांव खोदलेलें आहे. तें तोफ ओतणाऱ्या कारागिराचें असावें. या शिखरावरून सभोंवार दृष्टि फेंकून भोंवतालचा देखावा पहात बराच वेळ घालवावा, अशी साहजिक इच्छा होते. एवढेंच नव्हे, तर नकळत बराच वेळ आपोआप निघून जातो. याप्रमाणें किल्ला पाहणें जाहल्यावर त्याचें यश गात आणि किल्ला बांधल्या वेळेपासून आज मितीपावतों ज्या अनेक राज्य-क्रांत्या झाल्या त्याबद्दल वाटाघाट करीत व किल्ला चांगल्या स्थितींत कायम राखिल्याबद्दल निजामसरकारची वाहवा करीत किल्ल्यावरून सावकाश उतरून आह्मी सर्वजण किल्ल्याच्या बाहेर पडलों.

दौलताबादेपासून सुमारें मैल दीड मैलावर कागजीपुरा अथवा कागदी-पुरा या नांवाचें गांव आहे. ज्या कागदासंबंधानें दौलताबाद प्रसिद्ध आहे तो दौलताबादी कागद येथें तयार होतो. या कागदाचा खप व्यापारी लोकांत हिशेबाच्या वह्या बांधण्याच्या कामीं फार होतो.

याशिवाय वेरूळच्या वाटेवर रोझें ह्मणून एक गांव लागतें. याला खुलदाबाद असेंही ह्मणतात. या गांवांत अवरंगजेब बादशहाचें थडगें आहे. तें ज्या मशिदींत आहे ती मशीद पाहण्यासारखी आहे. अवरं-गजेबाच्या थडग्याशिवाय दुसरींही पुष्कळ थडगीं रोझ्यास आहेत, पण त्या सर्वांत बुऱ्हाणुद्दीनच्या थडग्याची मशीद प्रेक्षणीय आहे. अवरंगजेबाच्या दुष्टपणास बळी पडलेल्या गोवळकोंड्याच्या शेवटच्या हसन कुतुबशहाचेंही थडगें एथें आहे. बुऱ्हाणुद्दीन आणि अवरंगजेब ही जोडी दुष्टपणांत एकमे-कांवर ताण करणारी होती. पण मशिदीच्या बाबतींत बुऱ्हाणुद्दीनाच्या मशिदीनें आपल्या प्रतिस्पर्ध्यावर सरशी मिळविली आहे.



# औरंगाबाद.

वेरूळचीं लेणीं पहावयास निघालेला प्रवासी बहुत करून दौलताबादचा किल्ला पाहिल्याशिवाय राहत नाहीं व त्यानें औरंगाबाद हें शहर पाहिल्याशिवाय परतूं नये अशी आमची शिफारस आहे. औरंगाबाद हें जिल्ह्याचें ठिकाण आहे. औरंगजेब बादशाहानें हें शहर आपलें दक्षिणेंतील राजधानी केलें होतें. त्यामुळें त्याचें ऐतिहासिक दृष्ट्याही महत्व आहे. हें शहर अगदीं गर्द झाडींत आहे. औरंगाबाद हा निजाम सरकारच्या राज्यांतील एक जिल्हा आहे. हा प्रांत सुपीक असून लोक एकंदरींत सुखी दिसतात.

निजामच्या राज्याला मोंगलाई ह्मणण्याचा प्रघात पडला आहे. शिक्षा होईल अशीं भीति न बाळगतां वाटेल त्यानें वाटेल तसें वर्तन केलें ह्मणजे त्यानें मोंगलाई चालविली आहे असें ह्मणतात. अशा प्रकारची राज्यपद्धति कदाचित् पूर्वीं मोंगलाईंत असेल. पण हल्लीं इंग्रजीप्रमाणेंच तिकडेही शिस्त सुरू करण्यांत आलेली आहे. या प्रांतांत प्रवास करीत असतां एक गोष्ट स्पष्टपणें नजरेस आली ती ही कीं, इंग्रजीपेक्षां मोंगलाईंत अधिकाऱ्यांचा फार दरारा असतो. काळ्या डगल्याला चोहोंकडेच लोक भिऊन वागतात, पण मोंगलाईंत त्यांचा जास्त करडा अमल असावा असें दिसतें. आह्मी आगगाडीच्या डब्यांत असतांना औरंगाबादेस तपासणी कशी होते, फार त्रास पडतो काय, फार वेळ थांबावें लागतें किंवा कसें याची डब्यांत असलेल्या औरंगाबादेस जाणाऱ्या लोकांत थोडी चौकशी केली. तेव्हां एका मारवाड्यानें, अहो रावसाहेब, तुह्मां सर्वांस अडकवून ठेवतील, किंबहुना औरंगाबादेंत न जाऊं देतां परत पाठवितील, अशी भीति दाखविण्याचा आव घातला. परंतु त्याच्या जवळच चुकीचें तिकिट निघाल्यामुळें त्याची मात्र त्रेधा उडाली व बिचारा विरमून जाऊन पुढें स्तब्ध बसला. प्लेगला सुरवात झाल्यापासून आगगाडीनें येणाऱ्या प्रवाशांजवळ, ज्या गांवांहून ते आले असतील त्या गांवच्या योग्य अधिकाऱ्यांच्या सहीचा तें गांव प्लेगनें

दूषित नसल्याबद्दल दाखला असल्यास त्यांस कोणत्याही तऱ्हेनें त्रास होत नाहीं.

मोंगलाईत करोडगिरी हें मोठें उत्पन्नाचें खातें आहे. मोंगलाईतून बाहेर जाणाऱ्या व बाहेरून मोंगलाईत येणाऱ्या मालावर जकात वसूल करण्यासाठीं या खात्याची योजना आहे. औरंगाबाद स्टेशनच्या कम्पाउंडाच्या बाहेरच करोडगिरीचें नाकें आहे. उतारूंचें सामान येथें तपासतात. पांढरपेशा मंडळीस फारसा त्रास पडत नाहीं. छपवून माल नेणाऱ्या व्यापारी वगैरे लोकांस येथें बराच वेळ थांबावें लागतें. शहरांत जावयास तांगे स्टेशनावर मिळतात. स्टेशनापासून शहर एक कोसभर आहे. तांगे व त्यांचे घोडे पाहून हसूं येतें. तांग्याच्या फाटलेल्या टपाच्या पताका वाऱ्यांत फडफडताहेत, गांवठी चाकें सडकेवर खडखड वाजताहेत, घोड्यांच्या आंगावर माशा भणभणून राहिल्या आहेत, घोड्याच्या खोगराच्या लेंड्या तुटलेल्या आहेत, सतरा ठिगळें देऊन जाड सुतळीनें शिवलेल्या चामड्याच्या खोगरावर मळकट कपडे घातलेला तांगेवाला चाबूक फडाफड आपटून पायांत पाय अडकणाऱ्या रोडमल घोड्यास तोंडानें एकसारखा ह्या ह्या ह्मणत खूप जोरानें तांगा हांकीत आहे, व तांग्यांत बसलेल्या स्वाऱ्यांस खुष करण्याचा प्रयत्न करीत आहे, तरी घोडे मध्येंच हळु चालताहेत तर दुडदुड पळण्याची हुलकावणी दाखविताहेत, अशा थाटानें स्वाऱ्या एकदांच्या बिऱ्हाडीं जाऊन पोंचतात!

इंग्रजींत राहणाऱ्या लोकांपेक्षां मोंगलाईतील लोकांमध्यें अगत्य जास्त असतें असा मोंगलाईत प्रवास केला असतां अनुभव येतो. ज्या दिवशीं आह्मी औरंगाबादेस पोंचलों त्या दिवशीं दुपारीं शहरांतील प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासाठीं आह्मी बाहेर पडलों. औरंगाबादेस आह्मी गेलों तेव्हां रोजाचे दिवस होते. त्यामुळें सरकारी आफिसें सकाळीं भरत असत. मुलकी आणि दिवाणी अधिकार मोंगलाईत एकाच अधिकाऱ्याकडे असतात. जिल्ह्याच्या मुख्य अधिकाऱ्याला तालुकदार असें ह्मणतात. तोच मुख्य न्यायाधीश असतो. औरंगाबादची तालुकदारकचेरी एका

सुंदर आणि रमणीय बागेंत आहे. दुसऱ्या कचेऱ्याही आसपास आहेत. मुनसिफ कोर्टाच्या समोर एक पाण्यानें भरलेला हौद आहे. त्याला हत्ती-हौद असें ह्मणतात. शहरांतील मशिदींत शहागंज नांवाची मशीद प्रसिद्ध आणि प्रेक्षणीय आहे. तिच्या पुढें एक विस्तीर्ण असा जळानें तुडुंब भरलेला हौद आहे. त्यांत तांबड्या, पिंवळ्या, हिरव्या व सोनेरी रंगांचे मासे सोडलेले आहेत. मशीद पाहावयास जाणारे लोक साळीच्या लाह्या व मुरमुरे बरोबर घेऊन जातात व ह्या माशांपुढें टाकतात ह्मणजे घटकाभर चांगली मौज पहावयास मिळते.

शहराबाहेर पाणचक्कीवाल्याचा दरगा आहे. बादशहानें नळ देण्याचें या दरग्याच्या मालकास नाकारल्यावरून त्यानें स्वतंत्र नळ आणिला. या दरग्याला शहासफीबचा बाग असेंही ह्मणतात. शहासफीबची विद्वत्तेबद्दल फार ख्याति होती. या दरग्यांत पाणी मुबलक आहे. त्या पाण्याच्या जोरावर एक पीठ दळण्याची पाणचक्की चालू असते. दरग्यांत बाग रमणीय आणि विस्तृत असून आंतील इमारती स्वच्छ आणि बऱ्याच मोठ्या आहेत. या ठिकाणीं कांहीं वेळ घालवावा असें वाटतें व सुप्रसन्न मनानें आपण बाहेर पडतों.

औरंगाबाद येथील सर्वांत सुंदर अशा इमारतीकडे आपण आतां वळूं, या इमारतीस मुकरोबा ह्मणण्याची वहिवाट पडली आहे. हा मुकरोबा श्रावणाच्या महिन्यांत शिराळशेट बनणाऱ्या सक्रोबाचा भाऊ आहे कीं काय असें वाचकांस वाटण्याचा संभव आहे. पण तशांतला कांहीं प्रकार नाहीं. त्यास कोणी मुकबरा असेंही ह्मणतात. पण खरें नांव मकबरा हें होय. औरंगजेब बादशहानें आपल्या रबिया दुराणी बेगमेची कबर या ठिकाणीं बांधिली आहे. मकबरा या शब्दाचा अर्थ म ह्मणजे स्थान व कबरा ह्मणजे कबर यावरून कबरस्थान हा होय. हें कबरस्थान बांधण्यास नऊ लक्ष रुपये खर्च लागला. या इमारतीच्या सौंदर्याची कल्पना पुस्तकास जोडलेल्या तिच्या चित्रावरून थोडी तरी करितां येण्यासारखी आहे. सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व गाजविणाऱ्या बादशहाचे बेगमेचें हें स्मारक उभारिलें असल्यामुळें त्याला जितकी शोभा आणितां येईल व तें जितकें रमणीय आणि मनोल्हादक करितां येईल तितकें करण्यांत आलें आहे, हें उघड आहे.



मुकरोबा.

मुकरोबाच्या भोंवतीं सभोंवार दगडी भिंत बांधलेली आहे. आंत सुंदर बगीचा असून त्याच्या मध्यभागीं कबरस्थान आहे. आंत शिरण्याचा मुख्य दरवाजा दक्षिणाभिमुख आहे. तेथें देवडी असून फकीर बसलेले असतात. देवडींतून चार पावलें पुढें जातांच मध्यभागीं असलेली सुंदर संगमरवरी दगडाची इमारत व भोंवतालचा मनोरम देखावा अवलोकन करून आनंद होतो. समोर इमारतीकडे जावयाचा मार्ग फरसबंदी आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस कठडा आहे. या मार्गाची रचना अशी केलेली आहे कीं, कठड्यास लागून प्रथम दोन्ही बाजूंस जाण्यायेण्यास फरशी आहे. या फरशीला लागून निरनिराळ्या प्रकारचीं फुलझाडें लावण्याकरितां फरशीच्या बनविलेल्या वेलबुट्टीच्या आकाराच्या जमिनींत कुंड्या आहेत. त्या कुंड्यांच्या जागेस लागूनच पुनः नुसता फरसबंदी व लांबोळा असा जाण्यायेण्याचा मार्ग आहे, व या सर्वांच्या मध्यभागीं फरशीच्या व कुंड्यांच्या उंचीला धरून एक लांबचलांब उथळ कारंजें बांधलेलें आहे, व त्यांत सारख्या अंतरावर नळ्या बसविलेल्या आहेत. या मार्गांतील कुंड्या जेव्हां फुलझाडांनीं भरलेल्या असतील व मधल्या नळ्यांना हजाऱ्या बसवून त्यांतून जेव्हां पाण्याचे फवारे वाऱ्याच्या झुळकेबरोबर इतस्ततः डोलत असतील, तेव्हांची शोभा खरोखर विशेष चित्ताकर्षक असेल यांत संशय नाहीं. या वाटिकेंतून सावकाश चालत मध्यभागच्या इमारतीकडे पहात व इमारतीच्या वरच्या मजल्यावरून मोत्यासारखें स्वच्छ पाणी वाहत येऊन इमारतीपुढील कारंज्यांत सांठवून त्यापासून भोंवतालच्या सर्व नळ्यांस पाण्याचा पुरवठा होतो, त्याकडे पहात व त्याबद्दल आनंदानें कौतुक करीत आह्मी अगदीं इमारतीजवळ जाऊन पोंचलों.

इमारतीच्या तळमजल्यांत डाव्या हाताच्या एका खोलींत बेगम रबिया दुराणीचें ह्मणून कांहीं सामान संग्रह करून ठेविलें आहे. बेगमेची कबर पाहण्यास जिन्यानें दुसऱ्या मजल्यावर जावें लागतें. वर जाण्यास चारी बाजूंनीं जिने आहेत. डाव्या हातच्या जिन्यानें वर गेलें ह्मणजे कठडा लागतो. त्याच्यापुढें पाण्यानें भरलेला एक हौद आहे. या हौदासभ-

त्यांच एक हौद मागच्या बाजूस आहे. पुढच्या बाजूस इमारतीच्या दोन कोपऱ्यांला दोन मनोरे आहेत. मध्यभागच्या इमारतींत आंतल्या बाजूस मध्यभागीं एक अष्टपैलू स्फटिकांत कोरलेलें मखरासारखें सुंदर नक्षीकाम असून त्याच्या मध्यभागीं कबर आहे. हें काम नांवाजण्यासारखें सुंदर व मनोहर आहे. वरील दोन्ही हौदांभोंवतीं चांगली प्रशस्त जागा असून येथून इमारतीभोंवतालचा बागेचा देखावा छान दिसतो. कबरस्थानाच्या तीन बाजूंस बागेंत अगदीं गुळगुळीत दगडाच्या बांधलेल्या इमारती आहेत. एकींत कुराणांतील वाक्यें लिहिलेलीं आहेत. आंत येतांना लागणाऱ्या ज्या मार्गाचें वर्णन केलें आहे, असे मार्ग मुख्य इमारतीपासून चारी दिशांना आहेत, व प्रत्येक कोनाला जी जागा राहते त्यांत दोन दोन अष्टपैलू विहिरी आहेत व भोंवतीं झाडें लावलेलीं आहेत. जेव्हां हें स्थान उत्तम स्थितींत असेल त्या वेळेस तें खरोखर फारच रमणीय आणि विलासी लोकांस सुखकारक असेल यांत संदेह नाहीं. आग्रा येथील प्रसिद्ध ताजमहालाच्या नमुन्यावर हें काम केलेलें आहे. एखादी इमारत ताजमहालाची भिकार नक्कल आहे असें ह्मणणें ह्मणजे खरोखर त्या इमारतीची स्तुति करण्यासारखें आहे. ती स्तुति या इमारतीला लागू करण्यास कांहीं हरकत नाहीं. ज्यांना आग्र्यास जाऊन सर्व जगांतील अत्यंत सुंदर अशी ताजमहालासारखी इमारत पाहण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं त्या महालाची नक्कल ह्मणजे औरंगाबाद येथील मुकरोबा पहावा!

या इमारतीशिवाय या शहरांत कांहीं कारागिरीच्या धंद्यांचें काम पाहण्यासारखें आहे. औरंगाबाद हें फार दिवसांपासून काचवीच्या कामाबद्दल प्रसिद्ध आहे. काचवीचें काम करून चरितार्थ चालविणारे या शहरांत सुमारें तीनहजार लोक आहेत असें आह्मांस चौकशीअंतीं समजलें. पितळी पत्रे करून त्याचें नकशी काम बनवावयाचें, टिकल्या पाडावयाच्या, टोप्या वगैरे करावयाच्या याला काचवीचें काम ह्मणतात. खरे व खोटे जरीचे कांठ तयार करण्याचेही कांहीं कारखाने येथें आहेत. निजामसरकारांनीं येथें उद्योगधंद्याचें शिक्षण देण्यासाठीं एक टेक्निकलस्कूल

स्थापन केलें आहें. त्यांत सुतारकी, खोदींव काम व औरंगाबाद जिल्ह्यांत फार दिवसांपासून चालत आलेले धंदे शास्त्रीय पद्धतीनें शिकवितात. ही शाळा चांगली चालली आहे.

औरंगाबाद शहर दोन टेंकड्यांवर वसलेलें आहे. निमें शहर उतरणीवर आहे व निमें चढावर आहे. अशी स्वाभाविक सोय असल्यावर शहरांतील सांडपाणी काढून देऊन शहराचें आरोग्य वाढविण्याचें काम अगदीं सुलभ व्हावें, पण तसें झालेलें दिसत नाहीं. शहरांत जितकी स्वच्छता असावयास पाहिजे तितकी नाहीं. पाणी मात्र विपुल आहे. जिकडे तिकडे हौद पाण्यानें कांठोकांठ भरलेले असून वरून पाणी वाहतांना दृष्टीस पडतें. तें पाहून नगरासारख्या निपाणी गांवच्या लोकांना इतकें पाणी लोक विनाकारण कां वांया दवडतात म्हणून हळहळ वाटते ! स्वाऱ्या वाहण्याच्या या शहरांतील सर्व बैलगाड्यांस बुरखा असतो. मग त्यांत बसून जाणाऱ्या स्त्रिया हिंदु असोत अगर मुसलमान असोत. इतर ठिकाणीं गवत अगर कडबा गाड्यांतून अगर माणसें डोक्यावर ओझीं वाहून विकावयास आणितात. बैलावर लमाण लोक ज्याप्रमाणें सरपण विकावयास आणितात त्याप्रमाणें इकडे बैलावर गवताचे भारे विकावयास येतात. इंग्रजींत भय्याच्या हातांत मोठी काठी असावयाची पण इकडे हत्याराचा कायदा लागू नसल्यामुळें पुष्कळ लोक हत्यारें घेऊन वावरतांना दृष्टीस पडतात. घरावर अगर दुकानावर नौकर ठेवून त्यांच्याजवळ हत्यारें ठेवण्याचा प्रघात मोंगलाईत फार आहे. हे हत्यारबंद लोक जितके ऐटबाज व पिळदार दिसावयास पाहिजेत तितके ते दिसत नाहींत. कांहींतर निवळ शेंदाड शिपायांसारखे नेभळे दिसतात.

औरंगाबाद हें छावणीचें ठिकाण आहे. येथें हायस्कूल असून त्याला एक कालेजचा वर्ग जोडलेला आहे. शहराबाहेर स्टेशनच्या रस्त्यावर सरकारी दवाखानाही आहे. सारांश, इंग्रजी अमलांत जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं असणाऱ्या सर्व संस्था येथें आहेत. या प्रांतांत कापूस बराच पिकत असल्यामुळें येथें एक कापडाची गिरणीही स्थापन झालेली आहे.

समाप्त.

## नवीन सचित्र ऐतिहासिक मासिक पुस्तक.

# इतिहाससंग्रह.

जीर्णोद्धार हें महत्पुण्य आहे. कुलदेवतेचें किंवा ग्रामदेवतेचें देऊळ, कालचक्राच्या योगानें जुनें होऊन पडावयाच्या बेतास आलेलें पाहून, तिचे खरे भक्त तें यथाशक्ति दुरुस्त करायास लागतात किंवा पुनः नवें बांधितात, त्यावरून सज्जन त्यांस धन्य मानितात, आणि त्यांचा मोठा लौकिक होतो. तो अगदीं यथार्थ आहे. त्याच न्यायानें, आपल्या वाडवडिलांची कीर्तिदेवता, इतिहासरूपानें, ज्या हस्तलिखितांवर आज शेंकडों वर्षे वास करीत आहे, तीं हस्तलिखितें, कालचक्राखालीं सांपडून, इतर वस्तूंप्रमाणें, अगदीं जीर्ण झालीं आहेत, तीं इतकीं कीं दाहापांच वर्षांत तीं समूळ नाहींतशीं होतील असें भय आहे. तीं हस्तलिखितें हीं आपल्या वाडवडिलांच्या कीर्तिदेवतेचीं देवालयेंच आहेत, त्यांचा जीर्णोद्धार करणें, ह्मणजे तीं छापून त्यांस चिरस्थायीपणा देणें हें सध्याच्या काळीं आपलें एक अत्यंत महत्वाचें कर्तव्य आहे, आणि तें अत्यंत पुण्यप्रद आहे. आणखी हें कृत्य फार मोठें आहे, तरी त्याचें जोखीम राष्ट्रांतल्या प्रत्येक माणसावर, प्रत्येक कुलावर, प्रत्येक गांवावर, आणि प्रत्येक प्रांतावर एकसारखें आहे. त्यांत वगळ नाहीं. तेव्हां, इतक्यांनीं मनावर घेतल्यास हें काम अगदीं सहज पार पडण्यासारखें आहे. ह्या विचार मनांत आणून हा **इतिहाससंग्रह** काढण्यास आरंभ केला आहे.

हें मासिक पुस्तक आगस्ट इ. स. १९०८ पासून मुंबई येथें 'निर्णयसागर' छापखान्यांत प्रतिमासीं सुंदर टाईपांत छापून प्रसिद्ध केलें जातें. मराठ्यांच्या इतिहासासंबंधाचे अतिशय महत्त्वाचे, दुर्मिळ व मूल्यवान् असे जुने कागदपत्र स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करण्याचा ह्या मासिक पुस्तकाचा मुख्य उद्देश असून, त्यांत विविध प्रकारची ऐतिहासिक माहिती, ऐतिहासिक गोष्टी, ऐतिहासिक टिपणें वगैरे विषयही, सुसंगत व सुबोध रीतीनें, प्रसिद्ध केले जातात. प्रत्येक अंक अत्यंत वाचनीय व मनोरंजक असा असून, त्यांत इतिहासप्रसिद्ध पुरुषांचीं, प्रसंगांचीं व स्थलांचीं चित्रेंही दिलीं जातात. ह्याचें संपादकत्व सुप्रसिद्ध मराठी ग्रंथकार रा. रा. **दत्तात्रय**

**बळवंत पारसनीस** ह्यांच्याकडे आहे. हें मासिकपुस्तक सर्वांगसुंदर असून तें सर्व इतिहासभक्तांस अत्यंत प्रिय झालें आहे; व त्यास **मुंबई सरकारांनीं** आपला उदार आश्रय देऊन त्याच्या उपयुक्ततेविषयीं व त्याच्या महत्त्वाविषयीं आपली मान्यता व्यक्त केली आहे; तेव्हां ह्याबद्दल अधिक लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. स्वदेशाच्या इतिहासाचा खरा अभिमान व खरी अभिरुचि बाळगणारा प्रत्येक गृहस्थ ह्या पुस्तकाचा संग्रह केल्यावांचून कधींही राहणार नाहीं, अशी आमची समजूत आहे.

## इतिहाससंग्रहाच्या पहिल्या वर्षांत आलेले विषय.

**१ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें:**—ह्यामध्यें होळकराच्या घराण्यांतील जगत्प्रसिद्ध साध्वी गंगाजलनिर्मल महाराणी अहल्याबाई हिच्या कारकीर्दींतील इ. स. १७७९–१७८०–१७८१–१७८२ ह्या चार वर्षांचीं, महेश्वरदरबारांतून नाना फडणविसांस आलेलीं, सुरस, मनोरंजक व महत्त्वाचीं बातमीपत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांवरून अहल्याबाईच्या दिनचर्येची व राज्यकारभाराची उत्कृष्ट माहिती प्राप्त होते.

**२ तंजावरचें राजघराणें:**—ह्यामध्यें श्री. छत्रपति शिवाजी महाराजांचे सापत्नबंधु व्यंकोजी राजे ह्यांच्या घराण्याचा अगदीं अप्रसिद्ध परंतु चित्तवेधक व उपयुक्त इतिहास क्रमशः प्रसिद्ध होत असतो.

**३ परराष्ट्रांच्या दरबारांतील मराठ्यांचे वकील:**—ह्यामध्यें सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींतील मुंबईच्या गव्हरनरांजवळील वकील रघुनाथ रणसोड; गोंव्याच्या पोर्तुगीज गव्हरनरांजवळील वकील नारायण विठ्ठल धुमे; आणि कलकत्याच्या गव्हरनरांजवळील वकील लाला सेवकराम ह्यांची अश्रुतपूर्व माहिती व महत्त्वाचीं अस्सल पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. तीं वाचून प्रत्येक वाचकास आश्चर्यानंद वाटल्यावांचून राहत नाहीं. ह्याच प्रकरणामध्यें पांदेचरीच्या फ्रेंच गव्हरनराजवळील मराठी वकिलाची माहिती व पत्रें प्रसिद्ध होणार आहेत. नंतर दिल्ली, हैदराबाद, श्रीरंगपट्टण वगैरे ठिकाणच्या वकिलांची माहिती प्रसिद्ध होईल.

**४ ऐतिहासिक चरित्रें:**—ह्यांत अहमदनगरची राणी रणशूर चांदबिबी व अकबरबादशाहाचा आमात्य राजा तोडरमल ह्यांचीं सचित्र चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. सुरजमल जाट, पिलाजी जाधवराव, फत्तेसिंग भोंसले, अलीबहादर इत्यादि सुप्रसिद्ध पुरुषांचीं चरित्रें क्रमशः प्रसिद्ध होतील.

**५ जुन्या ऐतिहासिक गोष्टी:**—ह्यामध्यें नाना प्रकारच्या ऐतिहासिक परंतु अप्रसिद्ध अशा जुन्या गोष्टी व सुरस महदाख्यायिका प्रसिद्ध होतात. त्यांतील माहिती किती नवीन, उपयुक्त व मनोरंजक असते, हें दौलतराव शिंदे, राणी रू- उर्दू बेगी, घांशीराम कोतवाल ह्यांच्या गोष्टींवरून दिसून येईल.

६ ऐतिहासिक चर्चाः—ह्यामध्यें, पाणिपतच्या युद्धांतून पळून आल्याचा आरोप, नारायणराव पेशव्यांचा वध, मस्तानीचा शेवट कसा झाला? ह्या तीन वादग्रस्त मुद्यांसंबंधानें चर्चात्मक विवेचन आलें आहे. तें इतिहासशोधकांस फार मनन करण्यासारखें आहे.

७ ऐतिहासिक टिपणें:—ह्यामध्यें निरनिराळ्या विषयांसंबंधाचीं परंतु अगदीं निवडक व मनोरंजक अशीं अस्सल पत्रें छापलीं जातात. हीं ऐतिहासिक टिपणें ह्मणजे इतिहासमहोदधींतील सुंदर व वेंचक अशीं मौक्तिकेंच ह्मटलें तरी चालेल. ह्यांतील प्रत्येक पत्र इतिहासदृष्ट्या मूल्यवान् आहे.

८ ऐतिहासिक स्फुट लेखः—ह्यामध्यें प्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. राजवाडे व इतर इतिहासजिज्ञासू व इतिहासभक्त ह्यांच्याकडून येणारे स्फुट लेख किंवा अस्सल पत्रें सवडीप्रमाणें प्रसिद्ध केलीं जातात.

ह्या विषयांच्या यादीवरून 'इतिहाससंग्रह' कशा रीतीनें मराठ्यांच्या इतिहासाची सामुग्री प्रसिद्ध करीत आहे, त्याची वाचकांस अल्पशी कल्पनाकरितां येईल.

## इतिहाससंग्रहांत आजपर्यंत प्रसिद्ध झालेलीं चित्रें.

(१) मालवणच्या किल्ल्यांतील शिवाजी महाराजांची प्रतिमा. (२) आर्म इतिहासकारानें प्रसिद्ध केलेलें शिवाजी महाराज यांचें चित्र. (३) श्रीमंत नारायणराव पेशव्यांचा वध. (४) अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला. (५) चांदबिबी. (६) दिल्ली येथील मयूरसिंहासन. (७) राजा तोडरमल. (८) व्यंकोजी राजे. (९) थोरले शाहुमहाराज. (१०) शिवाजी महाराजांचें घोड्यावरील चित्र. (११) दौलतराव शिंदे. (१२) उर्दू बेगी. (१३) राणी रूपमती आणि बाजबहादूर. (१४) शहाजी राजे. (१५) मस्तानी. (१६) मालेगांवचा किल्ला. (१७) नादिरशाहा. (१८) महमदशाहा. १९) महादजी शिंदे. (२०) नजीबखान रोहिला. (२१) राघोबादादा. (२२) मनुची (२३) विक्रमराजा. (२४) जंजिऱ्याचा किल्ला.